इतकेंच काय, पण जे परमार्थलाभासाठीं म्हणून सत्पुरुषास शरण जातात, ते सांप्रदायिकहि आपल्या सद्गुरूंजवळ प्रायः प्रापंचिक कर्मकथाच सांगत असतात, असें ठिकठिकाणीं आढळतें.

अशा ह्या जगाच्या राहाटींत पूर्वसुकृतानुसार ज्यावेळीं एखाद्यास सद्गुरुलाभ घडतो, असें आपण पाहतों, त्यावेळीं तो कोणत्या कारणांस्तव घडतो ? म्हणजे पायावर डोकें ठेवणाऱ्या इसमाचा कोणता अधिकार पाहून सत्पुरुष त्यास भेटतात व उपासना देतात ? हें कित्येक वेळां मोठें कोडेंच पडतें. कित्येक ठिकाणीं असें पाहण्यांत येतें कीं, डोकीवर शिरस्त्राण घालणें, हा जसा एक शिष्टाचार आहे, तसाच आपल्याला कोणी तरी गुरु असावा हा एक शिष्टाचार मानतात. मग त्यानंतर ज्याप्रमाणें देव्हाऱ्यांत दुसरे देव असतात, त्याप्रमाणें देव्हाऱ्यांत गुरूंच्या पादुका म्हणून असाव्या, ज्याप्रमाणें दैनिक वर्तमानपत्र आधुनिक नेमानें वाचतात, त्याप्रमाणें एखाद्या सांप्रदायिक ग्रंथाचीं कांहीं पानें नेमानें वाचावीं, ईश्वराचें स्मरण करावयाचें तर त एखाद्या गुरूंनीं सांगितलेल्या मंत्राच्या जपानेंच करावें, असेहि अनेक शिष्टाचार पाळण्यांत येतात. यांत वाईट कांहींच नाहीं. सारें चांगलें, शुभ, कल्याणकारकच आहे. पण या सांप्रदायिकांच्या ठिकाणीं परमार्थ-लाभाची तीव्र उत्कंठा असते काय ? ज्याला अध्यात्मशास्त्रांत मुमुक्षा म्हणतात, त्या मुमुक्षेची अखंड जागृति राहो, पण उभ्या वर्षांत कधीं स्मरण तरी त्यांस होतें काय ? शेंकडा किती सांप्रदायिकांच्या ठिकाणीं खरी मुमुक्षा उत्पन्न झालेली असते ? श्रीरामकृष्ण परम-हंसांनीं एकदां एका साधकाचें मानगुट धरून त्यास पाण्यांत बुडविलें व तो श्वासोच्छ्वासासाठीं कांहीं वेळ तडफडल्यावर त्यास बाहेर काढून सांगितलें कीं, “तूं पाण्यांत श्वासोच्छ्वासासाठीं जसा क्षणमात्र

तडफडत होतास, तशी मोक्षासाठीं अखंड उत्कंठा लागते, तेव्हां त्यास मुमुक्षा म्हणतात. व तोच मुमुक्षु सद्गुरुलाभानें मुक्त होतो."

पण श्रीरामकृष्ण परमहंसांकडे येणाऱ्या अनेक साधकांत असा मुमुक्षु आरंभीं एकहि नव्हता, असें म्हटलें असतां चालेल. मुमुक्षु त्यांस शरण येण्याचे ऐवजीं तेच योग्य मुमुक्षु बनविण्याकरितां सच्छिष्यांचे शोधांत होते. त्यांचे शिष्यांत अनेक रजोगुणी गृहस्थाश्रमी होते. उदाहरणार्थ स्टार थिएटरचे मालक गिरिशबाबु हे महाराष्ट्रांतील रंगनाथांचे प्रति काशिनाथपंत छत्रेच होते. हे दोघे रजोगुणी दिसले तरी त्यांचें संतप्रेम उत्कट असे ही गोष्ट वेगळी.

तात्पर्य, संतांस सहज शरण जाणाऱ्याच्या ठिकाणीं मुमुक्षा, आणि आपणासारिखे करिती तात्काळ हें संतांच्या ठिकाणीं सद्गुरूंचें ऐश्वर्य, ह्या गोष्टी त्यांच्या समागमांत साधकपणाचे आरंभींच प्रगट होत नाहींत असें दिसतें. यामुळें लायकीचे दाखले न मिळालेल्याहि उमेदवारांची संतांचे दारीं गर्दी बरीच दिसते. संत सर्वांस आश्रय देतात. कामनिकांचा सुद्धां ते तिरस्कार करीत नाहींत. ज्याचा जो अधिकार असेल, व ज्याचा जो स्वार्थ असेल, त्या मानानें त्याला ते हळूहळू उपासनेच्या मार्गाला लावतात, असें उघड दिसतें.

इतर सांप्रदायिकांची गोष्ट असो, पण तात्या जे मार्गदर्शकासाठीं भुकेले होते, तो मार्गदर्शक त्यांना कशासाठीं पाहिजे होता? तात्यांच्या ठिकाणीं त्यागवृत्ति चांगलीच प्रज्वलित होती. ते धर्मनिष्ठ होते. त्यांचें नित्यकर्म चुकत नसे. ते गुरुचरित्रादि ग्रंथांचें पठण करीत असत. श्रीधूतपापेश्वर या कुलदेवाच्या ठिकाणीं त्यांची विशेष भक्ति होती. ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करण्याची त्यांची सहज प्रवृत्ति होती. याप्रमाणें ते कांहीं सामान्य कोटींतले पुरुष नव्हते, हें निर्विवाद आहे. पण त्याबरोबर हेंहि उघड आहे कीं रामगीतेंत सांगितल्याप्रमाणें

कर्मत्याग करून केवळ आत्मज्ञानासाठीं सद्गुरूंचा आश्रय करावा, अशी भावना त्यांच्या ठिकाणीं मुळींच नव्हती. म्हणजे ते कट्टे कर्मयोगी होते. भक्तिमार्गी किंवा ज्ञानमार्गीहि नव्हते. कर्मयोगाचें अखेर पर्यवसान परमात्मज्ञानांत होऊन अंतीं मोक्ष मिळावा, हें ध्येय त्यांस मान्य होतें. पण यावेळीं ते या ध्येयासाठीं झटत नव्हते. 'शिव आणि सेवा' हाच त्यांचा उद्दिष्ट मार्ग होता. आणि याच मार्गाचे वाटाडे त्यांस पाहिजे होते.

तारीख १३ डिसेंबर सन १८९९ च्या दत्तोपंत सांडू यांस पाठविलेल्या एका पत्रांत ते लिहितातः-"एका ज्योतिषानें मला पुढील सालीं सत्पुरुषाचें दर्शन होईल व तेव्हांपासून तुझें भाग्य वाढतें राहील, असें सांगितलें आहे; व एकंदर परिस्थितीवरून तें खरें व्हावें, असें पूर्ण अनुभवास येण्याचीं चिन्हें होऊं लागलीं म्हणण्यास हरकत नाहीं व तोंपर्यंत कोणी कांहीं बोललें अगर लिहिलें तरी तें तसेंच शिलकेंत ठेवावयाचें व हल्लींचे दैववैचित्र्याचे दिवस गेल्यावर आपलें म्हणणें मान्य होईल अगर दुसऱ्याचें कबूल करण्याइतकें धैर्य येईल, असें म्हणून आल्या पत्रास उत्तर म्हणून दिलेलें नाहीं! कारण वाद वाढविण्यांत विना-कारण त्रास होणार आहे. इ०"

याप्रमाणें सद्गुरुलाभाचीं भाकितें तात्यांना ज्योतिषांकडून कळत होतीं, ज्योतिषावर त्यांचा पूर्ण भरंवसा असे, आणि शिवाय परि-स्थितीनें त्यांची जी विलक्षण अडवणूक केली होती, त्यांतून सोडव-णूक करणारा कोणी तरी तारक पुरुष लवकरच भेटला पाहिजे असें, त्यांची अत्यंत गरजु मनोदेवता त्यांस सांगत होती.

सुदैवानें हा पुरुष कोण तें त्यांस शोधावयासहि नको होतें. त्यांचे दोघेहि स्नेहि सांप्रदायी होते. आणि त्यांपैकीं दत्तोपंत सांडू यांचे सद्गुरु विद्यमान होते, ते खास धोपेश्वरचेच राहणारे असून,

त्यांचें व त्यांच्या ध्येयरूप कारखान्याचें दैवत धूतपापेश्वर हें एकच होतें. त्याचे ते उपासक व पुराणिक होते. त्यांच्या नांवाची एक सांप्रदायिक संस्था मुंबईस सांडूंच्याच बिऱ्हाडीं स्थापन झालेली होती व त्या संस्थेच्या द्वारां त्यांचें अलौकिक गुणवर्णन तात्यांच्या कानांवर बरेच दिवस येत होतें. तेव्हां तात्यांचे एजंट, सल्लागार, व स्नेही दत्तोपंत सांडू यांनीं त्यांचे आणखी गुरुबंधु व्हावें, असा योग ओघासच आला व तो त्यांचे हितचिंतक दत्तोपंत सांडू यांनीं प्रथम पत्रद्वारें घडवून आणला. पुढें त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचाहि धोपेश्वरीं योग येऊन त्यानंतर श्रीसद्गुरूंना आपल्या कारखान्यांत आणून त्यांच्या पदधूलीनें तो पावन करण्याचा मंगल प्रसंगहि घडून आला. तो कथाभाग यथावकाश पुढील प्रकरणांत सांगूं.

**जो संतांसी शरण गेला । संतजनीं आश्वासिला ।**
**मग तो साधक बोलिला । ग्रंथांतरीं ॥**

दासबोध.






# प्रकरण १८ वें

## काका महाराज पुराणिक

जितके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण ॥

दासबोध.

तात्यांचें व त्यांच्या आवडत्या कारखान्याचें दैवत श्रीधूतपापेश्वर हें स्वयंभू देवस्थान रत्नागिरी जिल्ह्यांत राजापूर तालुक्यांत ज्या गांवीं आहे, त्या गांवाला श्रीधूतपापेश्वर ह्या देवाच्या नांवावरून धोपेश्वर असें अपभ्रष्ट नांव पडलें आहे. धोपेश्वर हें गांव सह्याद्रीच्या उतारावर ढोंगरांतच असून हें एक रमणीय स्थान आहे. उदेपूरच्या एकलिंगजी-प्रमाणेंच या देवस्थानाची आख्यायिका आहे. डोंगरांत एका जाळींत रोज एक गाय आपला चोरलेला पान्हा सोडून दुग्धधारेचा अभिषेक करी; असें एका गोवाऱ्याला आढळून आलें, म्हणून त्यानें तेथील जाळी दूर करून पाहिलें, तों तेथें एक स्वयंभू शिवलिंग आढळलें. तेंच चितोडचें सुप्रसिद्ध एकलिंग देवस्थान होय. चितोड हें स्थानहि धोपेश्वराप्रमाणें डोंगरांतच आहे. चितोडचें म्हणजे उदयपूरचें राज्य हें त्या एकलिंगजीचे कृपेनेंच बाप्पा रावळ



ब्र० श्रीसद्गुरु रघुनाथ महाराज ऊर्फ काका पुराणिक—धांपेश्वर.

| जन्म | निर्याण |
|---|---|
| कार्तिक वद्य १३ शके १७४५ | कार्तिक शुद्ध १ शके १८३२ |

[ पृ. २०७

यांनीं स्थापिलें. तेव्हांपासून तें राज्य एकलिंगजीचें व उदयपूरचा राणा हा त्या एकलिंगजीचा दिवाण अशा भावनेनेंच राजस्थानांतील हें परम तेजस्वी राज्य चालत आलें. धोपेश्वर हें राजापुरांतील उदयपूर होय व त्याचे प्रतिनिधि श्रीसमर्थ काका पुराणिक करंबेळकर हे होत. श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिर हें एक शिवाचें तिसरें उदयपूर होय व त्याचे दिवाण तात्या पुराणिक होत.

काका पुराणिकांचे पूर्वज मूळ शीळचे राहणारे. तात्या पुराणिकांचे पूर्वज ज्याप्रमाणें पेंडखळ सोडून पनवेलच्या बल्लाळेश्वराजवळ राहण्यास आले, तसें काकांचे पूर्वजांना पावन करण्याकरितां श्रीधूतपापेश्वरांनीं आपल्या सन्निध आणलें. श्रीधूतपापेश्वर मंदिर धोपेश्वरच्या प्रसिद्ध धबधब्याचे कांठीं आहे. त्या धबधब्याचा उसळणारा शुभ्र धवल फेंस कर्पूरगौराचें यशच कीं काय असा गंभीर व मनोहर दिसतो ! श्रीधूतपापेश्वर मंदिरहि फार प्रेक्षणीय आहे. देवस्थानचें उत्पन्न व व्यवस्थाहि चांगली केलेली आहे. एकंदरींत श्रीधूतपापेश्वर मंदिरानें गरिब कोंकणाला ऐश्वर्यास चढविलें आहे. तसेंच श्रीधूतपापेश्वर आरोग्य मंदिरानें देशाचे आपत्कालांत पनवेलचें महत्त्व वाढविलें आहे. धोपेश्वरच्या शिवलिंगाचा एक तुकडा तेथून उडाला तो दुसरीकडे पडला, असें दाखवितात. पण मला वाटतें त्यांना तो खरा सांपडलाच नाहीं. तो पनवेलींत आला व त्यानेंच श्रीधूतपापेश्वर आरोग्य मंदिराची उभारणी केली. ही कल्पना ऐतिहासिक नसली तरी रम्य आहे.

तात्यांच्या पूर्वींच्या अनेक पिढ्यांत ज्याप्रमाणें वैदिक व शास्त्री निपजले, त्याचप्रमाणें काकांच्या पूर्वींच्या अनेक पिढ्यांत वेदशास्त्रसंपन्न असे अनेक शिवभक्त निपजले. काकांचे वडील विश्वंभरभट यांस भाऊभटजी किंवा भाऊकाका असें म्हणत. त्यांच्या मातोश्रींचें

नांव उमाबाई. भाऊकाका हे साक्षात्कारी शिवभक्त होते. एकदां ते दूरच्या गांवाहून घरीं पायीं येत असतां अरण्यांत त्यांना सशस्त्र वाटमाऱ्यांनीं गांठलें ! तेव्हां त्यांनीं धोपोबाचा (श्रीधूतपापेश्वराचा) धांवा करितांच पलीकडल्या रानांतून एक धिप्पाड शुभ्र नंदी शिंगें रोंखून डुरकण्या फोडीत त्या चोरांच्या अंगावर धांवत आला ! माणसांनीं पराण्या माराव्या तरी त्यांनीं पाय उचलूं नये असे बैलोबाच ज्यांनीं पाहिलेले, ह्या वाटमाऱ्यांनीं श्रीमहामृत्युंजयांच्या त्या बलिष्ट वाहनाचें अत्यंत उग्र स्वरूप पाहतांच त्यांचें धाबें दणाणलें व ते जीव घेऊन पळाले. त्यांना याप्रमाणें पिटाळून लावल्यावर तो नंदी भाऊ काकांजवळ आला, त्यांस त्यानें न्याहाळलेसें केलें, व जणूं ' नाभी ' अशी डुरकणी देत तो अरण्यांत गेला व दिसेनासा झाला ! ह्या संकटनिरसनाचें स्मारक म्हणून भाऊकाकांनीं चांदीच्या पादुका करून त्या श्रीशिवाला अर्पण केल्या, त्या अद्याप धोपेश्वराचे देवळांत आहेत.

या भाऊभटजींना उमाबाईंचे पोटीं काका पुराणिक हे कार्तिक वा। १३ शके १७४३ रोजीं जन्मास आले. रामाचें दैवत शिव व शिवाचें दैवत राम अशीच काकांच्या पूर्वजांची नामपरंपरा आहे. काकांचा आजा आणि निपणजा यांचीं नांवें रामचंद्र अशीं होतीं. त्यासच अनुसरून विश्वंभर भटजींनीं आपल्या मुलाचें नांव रघुनाथ असें ठेवलें.

काका हे बालपणीं फार हूड होते. लहानपणीं ते एकदां देवळाच्या मागील डोहांत बुडत होते. एकदां त्यांच्यावर कोणी मांता केली होती. एकदां त्यांना सर्पदंश झाला होता. पण या सर्व संकटांतून श्रीधूतपापेश्वरकृपेनें ते वांचले; इतकेंच नव्हे तर त्यांना ईशकृपेनें व सद्गुरुकृपेनें पुढें दीर्घायु प्राप्त झालें.

भाऊभटजींचे वडील बंधु नारायणभटजी नामक होते. ते वेदोनारायणच होते. त्यांच्याजवळ काकांचें वेदपठण झालें. पण त्यांची ऋक्-संहिता-पुरी होते तों त्यांचे परमपूज्य नानाकाका स्वर्गवासी झाले. त्याच सुमारास काकांची आईपण त्यांस बाळपणींच पोरकेपण देऊन गेली ! त्यानंतर धोपेश्वरचे कोणी बाबाजीबुवा म्हणून संस्कृतज्ञ होते, त्यांचेजवळ काकांनीं काव्य शिकण्यास आरंभ केला. पण आई व नानाकाका गेल्यामुळें काकांचें मन घरीं रमेना. विद्याध्ययनासाठीं कोठें बाहेर जावें, असें त्यांच्या मनानें घेतलें, परंतु वडिलांकडून बाहेर जाण्यास परवानगी मिळणें कठीण होतें. त्यांत त्या काळचे रिवाजाप्रमाणें काकांचें अकरावे वर्षीच लग्न झालें होतें. काकांच्या वडिलांप्रमाणेंच काकांचीं दोन लग्नें झालीं. पहिल्या बायकोचें नांव लक्ष्मीबाई. ती हर्डीच्या विश्वनाथ जावलेकराची मुलगी.

बायकोचा प्रेमपाश पडण्याचें तें वय नव्हतें. तेव्हां काकांनीं आपल्या विचाराचे एक दोघे समवयस्क तयार करून ते सर्व विद्यार्थी एक दिवस घरीं न विचारतांच विद्याभ्यासासाठीं घर सोडून चालते झाले ! काका व. त्यांचे सहाध्यायी धोपेश्वराहून निघाले ते पायींच कोल्हापुरास गेले. त्यावेळीं कोल्हापुरास ब्राह्मण आणि त्यांची विद्या यांचा राजाश्रय सुटला नव्हता. तेथें बाळकृष्ण आचार्य नामक एक वैष्णव विद्वद्वर होते. त्यांच्याजवळ काका प्रथम काव्य शिकले. त्यावेळीं ते लक्ष्मीनारायणाचे देवळांत मधुकरी मागून राहात असत. आणि रात्रीं लक्ष्मीनारायणाच्या नंदादीपाजवळ बसून शारदोपासनेंत रात्रींच्या रात्रीं घालवीत. काव्य म्हणून झाल्यावर त्यांनीं कौमुदी शिकण्यासहि आरंभ केला होता. पण इतक्यांत त्यांच्या वडिलांना त्यांचा पत्ता लागून ते त्यांस नेण्यास आले व घरीं घेऊन गेले. काकांची बुद्धि अथवा पूर्वसंस्कार इतके उच्च

दर्जाचे होते कीं, तेथें असतां कौमुदीचा ते जो जो श्लोक वाचीत तो तो गुरुजींनीं सांगण्यापूर्वींच त्यांस उत्तम समजे. असें पाहून गुरुजींनींच त्यांस घरीं जाण्यास रजा दिली. याप्रमाणें सुमारें दीड दोन वर्षें कोल्हापुरांत काढून ते घरीं गेले. त्यावेळीं त्यांची पत्नीहि वयांत आली होती. पण विद्येचें महाव्यसन ज्याला जडलें, त्याला गृहिणीचा मोह प्रतिबंधक होत नाहीं. त्यांनीं वडिलांची व कुटुंबाची समजूत करून ते विद्यार्जनासाठीं पुन्हां निघाले, ते कोल्हापुरास न जातां साताऱ्यास आले, ही विधिघटना होय. खरी विद्या त्यांस तेथेंच प्राप्त व्हावयाची होती.

त्यांच्या घरचें अठरा विश्वे दारिद्र्य असल्यामुळें चरितार्थाचें साधन म्हणून विद्या संपादन करणें अवश्यच आहे असें वडिलांसहि दिसून आलें. शिवाय काका यावेळीं पूर्वीप्रमाणें अल्पवयी नसून ते वीस वर्षांचे होते. त्यामुळें त्यांनीं यावेळीं त्यांस साताऱ्यास जाण्यास परवानगी दिली. साताराहि त्यावेळीं वेदविद्येचें माहेरघर होतें. साताराची राज्यलक्ष्मी अगोदर गेली आणि सरस्वति कांहीं काळ मागें राहिली, असें दिसतें. कारण लक्ष्मीइतकी ती चंचल नाहीं ! हेंच असावें. साताऱ्यास त्यावेळीं मोठमोठे षड्शास्त्री होते. त्यांत भास्करशास्त्री अभ्यंकर आणि राघवेंद्रशास्त्री गजेंद्रगडकर हें पंडितद्वय परम विख्यात होतें. त्यांच्याजवळ काका शिकूं लागले. त्यावेळीं सुप्रसिद्ध रामशास्त्री गोडबोले, अनंतशास्त्री पेंढारकर, आणि रामाचार्य हे काकांचे सहाध्यायी होते. यांपैकीं राघवेंद्राचार्यांचे चिरंजीव रामाचार्य यांची तयारी बरीच असून तेहि कधीं कधीं काकांना पाठ देत.

काका यावेळीं तात्या दिक्षीत यांचेकडे राहात असत; व देवळांत पुराणें सांगत आणि कांहीं विद्यार्थ्यांस पंचमहा काव्यें, व्युत्पत्ति, व्याकरण,

पुराणें वगैरे विषय पढवून ते आपला चरितार्थ चालवीत. त्यावेळीं साताऱ्यास रामचंद्र बळवंत कोल्हटकर या नांवाचे एक श्रेष्ठ रामोपासक राहात असत. ते पूर्वीं मराठ्यांच्या रिसाल्यांत शिलेदार होते. पण साताऱचें राज्यच खालसा झाल्यावर हळू हळू पूर्वीचे लष्करी अंमलदारहि कमी झाले. त्यांत कोल्हटकरांची शिलेदारीहि गेली. कोल्हटकर हे उंच काठीचे सदृढ व बाणेदार असे पुरुष होते. यांना पूर्वींच्या अंमलदारीच्या हक्कामुळें रावसाहेब असें म्हणत. त्यांना राधाबाई नामक महासाध्वी स्त्री होती. त्यांची शिलेदारी गेल्यानंतर थोड्या काळांनीं घरांत भाऊबंदांत तंटा होऊन त्यांनीं तेखानें घरदारहि सोडलें. त्यांच्या वडिलांनीं यांना पूर्वीं अध्यात्मरामायणाची हस्तलिखित पोथी दिली होती. ते संतप्रेमी होते. ते एकदां पंचवटीस गेले असतां तेथील एका थोर महंतानें प्रभुरामचंद्रांच्या लांकडी पादुका त्यांस दिल्या. पादुकांची पूजा व अध्यात्मरामायणाचें पठण हा त्यांचा नित्य क्रम असे. दर एकादशीस समग्र रामायणाची एक आवृत्ति ते करीत; व मग द्वादशीचें नित्यकर्म आटोपल्यावर पारणें सोडीत. अशा रीतीनें त्यांची रामभक्ति वाढतां वाढतां ते एक वर्ष चातुर्मास अयोध्येला गेले व तेथें रोज रामायणाची आवृत्ति पुरी केल्यावांचून फराळ करावयाचा नाहीं, असें कडक व्रत त्यांनीं चार महिने चालविलें. तेव्हां प्रभु रामचंद्र त्यांचेवर प्रसन्न होऊन त्यांस दृष्टांत झाला कीं, साताऱ्यास अमुक ठिकाणीं त्यानां त्यांच्या सद्गुरूंचा लाभ घडेल व ते त्यांस कृतार्थ करतील. त्यानंतर ते साताऱ्यास आले व सद्गुरुभेटीच्या दिवसाची अत्यंत उत्कटतेनें वाट पहात असतां तो सोन्याचा दिवस उगवला व पीरवाडीच्याजवळ त्यांना श्रीसंभाजी महाराजांचें दर्शन झालें. त्यांना पाहतांच हेच आपले सद्गुरू असें कोल्हटकरांनीं ओळखलें. तेव्हां त्यांनीं त्यांना दंडायमान नमस्कार घातला. श्रीसंभाजी

महाराजांनीं त्यांना उठवून कडकडून भेट दिली व पुढें कालें करून कृतार्थ केलें.

कर्मधर्मसंयोगानें या रावसाहेबांची व काकांची साताऱ्यास गांठ पडली. काकांचें मन त्यांचेकडे वेधलें. त्यांच्याबद्दल काकांच्या मनांत अत्यंत आदर उत्पन्न झाला. रावसाहेबांचें प्रेमहि काकांवर बसलें व पुढें यथावकाश रावसाहेबांचें रामायण व पुजेच्या पादुका उपासनेसाठीं काकांस मिळाल्या. यामुळें हेच काकांचे गुरु होत, असें कोणी कोणी मानतात. कदाचित् तसें असेलहि. पण पूर्वीच्या घरंदाज कुटुंबांत मुलानें घरांत वागतांना बापापासून आदरानें दूर वागावें, पण आजोबांस प्रेमानें व निर्भयतेनें चिकटावें, असे प्रकार आढळत. त्याप्रमाणें काकांना रावसाहेब कोल्हटकर यांचेबद्दल फार आदर व दरारा वाटे. पण ज्यांच्या ठिकाणीं काकांच्या प्रेम आणि आदर या कांहींशा विसंगत वृत्तींचें मधुमीलन होई, ती व्यक्ति वेगळी होती. ती व्यक्ति म्हणजे रावसाहेब कोल्हटकरांचे गुरु पीरवाडीचे संभाजी महाराज होत.

साताऱ्याहून सुमारें दोन मैलांवर माहुली रस्त्याचे बाजूला एक पीराचें स्थान आहे. व त्या पीराचे दर्ग्याजवळ कांहीं मुसलमान व मराठे यांची वस्ती आहे, त्यास पीरवाडी असें म्हणतात. या वाडींतील उतेकर नामक मराठे पाटील घराणें हें या पीराचें एक प्रमुख मानकरी असे. या घराण्यांत पूर्वीं शहाजी व उदाजी असे दोन सत्पुरुष होऊन गेले. उदाजी हे श्रीरामदासस्वामींचे समकालीन होत. त्यांच्या हमेश भेटी होत. सज्जनगडाच्या समोरच शिलोबा म्हणून एक डोंगर आहे. त्यावर श्रीशंकराचें स्थान आहे. हे शीलनाथ अथवा शिलोबा,पीरवाडीचे पाटलांचें कुलदैवत होय. या शीलनाथांवर उदाजीची व त्याचे वंशजांची परमनिष्ठा असे. असें सांगतात कीं,उदाजी या

## पृ २१५ ओळ दुसरी.

उदाजीचे पोटींच संभाजी महाराज जन्मले अशी माहिती मिळते. ते दीर्घायु होते. तरी संभाजी महाराजां चे वडील श्रीरामदासांचे समकालीन कसे असतील? ह्या शंकेला जागा राहाते. यास्तव 'उदाजीचे पोटींच' या शब्दाठिकाणीं 'उदाजीचे वंशांत' असें वाचावें.

शिलोबाचे डोंगरावर व समर्थ सज्जनगडावर असतां योगबलानें त्यांचे कांहीं विचारविनिमय चालत. या उदाजीचे पोटींच श्रीसंभाजीमहाराजांचा जन्म झाला. हे साक्षात् शिलोबा अथवा शीलनाथच, अशा भावनेनें यांना नाथ असेंहि म्हणत. यांच्या स्त्रीचें नांव मानाबाई होतें. तीहि मोठी सुशील स्त्री होती. एकदां श्रीजालिमसिंग या नांवाचे कोणी एक रजपूत महात्मे सिंहलद्वीपाहून साताऱ्यास आले व ते पीरवाडी शेजारीं एका पिंपरीच्या झाडाखालीं बसून राहिले. त्यांच्या दर्शनास अनेक लोक येत. पण त्यांना त्या लोकांशीं कांहीं कर्तव्य नव्हतें. पुढें संभाजी त्यांच्या दर्शनास गेले. तेव्हां त्यांची ऐकमेकांची दृष्टादृष्ट होऊन गुरुदीक्षेचें कांहीं कार्य पहिल्या दृष्टिक्षेपांतच होऊन गेलें. मग ते जालिमसिंग त्या झाडावर चढले व संभाजीस त्यांनीं मागोमाग वर बोलाविलें. संभाजी हे जन्मसिद्धच फार मोठ्या अधिकाराचे पुरुष होते. त्यांनीं हेच आपले सद्गुरु असें त्यांस ओळखलें व तेहि वर चढले. वरतीं गेल्यावर असें सांगतात कीं, जालीमसिंगांनीं संभाजीमहाराजांस कांहीं दह्यासारखा किंचित् पदार्थ पिंपरीच्या पानाचा द्रोण करून त्यास खावयास दिला व त्याबरोबरच त्यांस सर्वाधिकार प्राप्त झाला. समयींत तेलवात तयार असल्यावर मग काय पेटविण्याचाच अवकाश, कीं स्वयंप्रकाशत्व सिद्ध झालेंच. त्यानंतर थोडे दिवस ते महात्मे त्या वृक्षाजवळच राहिले. तेथें असतां संभाजीमहाराज त्यांची एकनिष्ठभावनेनें सेवा करीत. एक दिवस ते गुरुमहाराजांना आपले घरून दूध नेत असतां त्यांच्या बायकोनें सहज सुचविलें कीं, सारेंच नेऊं नका, पोराबाळांना राहूं द्या. संभाजीनीं तें न ऐकतां सारेंच दूध नेलें. पण ह्या बायकोच्या विकल्पामुळें नाथ महाराज आज दूध घेणार नाहींत, असें त्यांच्या मनांत घोळत राहिलें. त्याचप्रमाणें झालें. महाराजांनीं दूध घेतलें नाहीं. 'तुझ्या पोराबाळांना असूं दे' असे खुणेचे शब्द ते

बोलले. कोणी म्हणतात कीं, त्यावेळीं संभाजींच्या मनांतील चिंतनांत खंड पडला हें जाणून त्यांनीं त्यांचे हातचें दूध घेण्याचें नाकारलें. चिंतनांत खंड येऊं देऊं नये, चिंतनधारा शुद्ध व अखंड असली पाहिजे, अशी त्यांची कडक शिस्त असे. या शिस्तीप्रमाणें संभाजीमहाराज वागत आहेत अगर नाहींत हें बाहेर कोणालाच कळत नसे. ती गोष्ट एक त्यांचे सद्गुरुच जाणत. कांहीं दिवसांच्या त्यांच्या गुरुसेवेनें म्हणजे गुर्वाज्ञेच्या उत्कृष्ट पालनानें सद्गुरु संतुष्ट झाले. संभाजीमहाराज त्यांच्या परीक्षेंत पुरे उतरले. त्यांची तयारी पूर्वजन्मींचीच असली पाहिजे, ते निरक्षर होते व या जन्मीं त्यांना सत्समागमाचा अन्यत्र लाभहि घडलेला नव्हता. राखेंत अंगार झाकलेला असावा, असें त्यांचें ज्ञान स्फुलिंग एका गरीब निरक्षर पाटीलकीचे वंशांत गुप्त तयारच होतें. सद्गुरूंच्या अल्पसेवेनें वरची राख बाजूला झाली आणि आत्मप्रभा उजळली. मग गुरु आणि शिष्य यांत न्यूनाधिक भाग उरला नाहीं. तथापि अशा ऐक्यबोधांतहि त्यांच्या अंतःकरणोपाधीस पुढें परस्परांचा वियोग दुःसह झाला! हें ईश्वरी मायेचें अजब कौतुक आहे. आपलें कार्य झालें असें समजून जालीमसिंग ज्यावेळीं संभाजीस सोडून जाऊं लागले, त्यावेळीं एकमेकांचा वियोग एकमेकांस क्षणमात्र दुःसह झाला. त्या प्रसंगाचें एक चारित्रकार कवि वर्णन करितातः—

**" शिष्य रडे, गुरुहि रडे, शिष्य बघे गुरुकडे तसाच गुरू ।**
**शिष्याकडे बघे, पण भाषण दोघांत होइनाच सुरू ॥ १२५ ॥**

**गुरुशिष्यांचें नातें दोघे विसरून एकमेकांना ।**
**कडकडुनि आलिंगिति रडत उरे भान त्यांत दोघां ना ॥१२६॥**

**गुरुशिष्य प्रतिमा त्या समयाच्या काढिल्या जरी असत्या ।**
**तर फार बरें होतें त्या आज पहावयास तरि मिळत्या ॥१२७॥**

इतुका अतुल जर असे अमुचा आनंद तच्छ्रवणजन्य ।
प्रत्यक्ष पहाणारा तें जर कोणी असेल तो धन्य ॥ १२८ ॥

*    *    *    *

कांहीं कालें स्थितिवर येऊनि गुरु करून मन घट्ट ।
नाथास म्हणे जातों मी तूं बस घरिं, करूं नको हट्ट ॥ १३१ ॥

तूं ऐक सांगतों तें तुझ्या हातून अजुन व्हायाचें ।
आहे बा संभाजी जगांतलें कार्य बहु महत्त्वाचें ॥ १३२ ॥

जें लांकुड ज्या चुलिचें तें त्याच चुलींत पाहिजे जळलें ।
या तत्त्वाचें इंगित तूं ध्यानीं धरुन पाहिजे असलें ॥ १३३ ॥

संभाजीमहाराजांच्या पूर्वायुष्यांतील अनेक मनोरंजक व उद्बोधक गोष्टी प्रसिद्ध आहेत. विस्तारभयास्तव त्या येथें देतां येत नाहींत. एकच प्रकार येथें सांगतों, ते जबरदस्त सत्याग्रही होते. त्यांच्या पूर्ववयांत त्यांच्या घरची फारच गरीबी होती. त्यांचा पेशा शेतीचा होता. गुरें चारण्यास न्यावीं तर पायांत जोडा नाहीं, त्यामुळें बाभळीचें कांटे भरत, म्हणून एक दिवस ते आडून बसले. " गुरें-ढोरें देवाचीं. त्याला गरज असेल तर तो माझ्या जोड्याची तजवीज लावील. नाहीं तर गुरें राहातील घरींच." असें म्हणून ते खुशाल स्वस्थ बसले. तेव्हां कांहीं वेळानें झकत एक इसम जोडा घेऊन आला आणि पाटीलांना हांक मारून ते बाहेर येतात, तों जोडा देऊन चालता झाला. पाटीलबुवांची जोड्याचीच अडचण होती असें नव्हे, तर मध्यान्हकालचीहि कांहीं दिवस पंचाईतच होती. उडिदाचा पाला उकडून त्यावर ते पंधरा पंधरा दिवस काढीत. एक दिवस ते भुकेनें वैतागून काम सोडून स्वस्थ बसले असतां एक गोसावी एका झोळींत भाकरी घेऊन आला. आणि पाटील आज तुम्ही भुकेले दिसतां; भाकरीचा एक चतकोर खा, असें म्हणूं लागला. पाटील

म्हणाले, "बाबारे, आज एक वेळ तुझी भाकरी खाऊन काय करणार ? उद्या कोण द्यायला बसलाय ? तुझा एक चतकोर मी कशाला घेऊं. माझा शिळोबा नाथ मला देईल तेव्हांच मी घेईन" मग त्या आलेल्या गोसाव्यानें मोठ्या मिनतवारीनें पाटीलबोवांस समजावलें कीं, "आजची वेळ ही भाकरी खा, मग तुम्हांला कधीं भाकरीची पंचाईत नाहीं पडायची." संभाजीनें ती भाकरी खाल्ली आणि त्यानंतर त्यांच्या शेतींत सुबत्ता होऊन माध्यान्ह काळची काळजी कायमची दूर झाली.

"समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥" या समर्थांच्या उक्तीचें प्रत्यंतर एकदा संभाजी महाराजांच्या मानाबाईंना आलें. रात्रीं परड्यांत गुरें बांधलीं होतीं. तेथें कांहीं खडबड सुरू झाली, म्हणून मानाबाई उठल्या व अर्धवट झोपेंतच काळोखांत परड्यांत गेल्या व गुरूं सुटलें आहे असा भास होऊन त्याला गळ्याला दावें लावून त्यांनीं एकीकडे बांधलें व त्या परत जाऊन निजल्या. सकाळीं पाहतात तों तो वाघ होता ! पाटीलबोवांनीं हांसत त्याला सोडून लावलें व पुन्हां आमच्या गुरांना त्रास द्यायला येऊं नको म्हणून बजावलें !

रावसाहेब कोल्हटकरांना त्यांच्या दृष्टांताप्रमाणें या संभाजीमहाराजांचें दर्शन झालें. तेव्हां रावसाहेबांनीं नाथांस हेच माझे सद्गुरु म्हणून ओळखलें, ही हकीगत वरतीं लिहिलीच आहे. त्यांच्याच माहितीनें काका पीरवाडीस नाथांच्या दर्शनास जाऊं लागले. तेथें आर्तजनांची सदा गर्दी असे. पण त्यांत रावसाहेबांसारखे निष्ठावंत तेच. त्यांची सद्गुरुचरणीं निष्ठा पाहून काका चकित होत. नाथांची ती बुटकी, गिड्डी, शामवर्ण, तेजस्वी, आनंदी मूर्ति त्यांच्या हृत्फलकावर कायमची कोरली गेली ! तरी पण त्यांना वंदन करितांना ते शूद्र मी अधीत ब्राह्मण हा विकल्प त्यांचे मनांत

वरचेवर आल्यावांचून राहिला नाहीं. सद्गुरूंना ज्यांचा स्वीकार करा-वयाचा असतो, त्यांचे सारे विकल्प तेच दूर करतात व त्यांस आपले सन्निध येण्याची तेच प्रेरणा करितात. पुढें पुढें काकांना नाथांचे दर्शनांवांचून चैन पडेना. ते रावसाहेबांची वाट न पाहतां आपण एकटेच वरचेवर पीरवाडीस जाऊं लागले. तेथें गेले म्हणजे त्यांस परतच यावेसें वाटेना. अशी त्यांची वाढत चाललेली निष्ठा पाहून नाथांनीं त्यांच्या मनांतील आशंकेचें किल्मिष दूर करावयाचें मनांत आणलें. एक दिवस काका नेहमींप्रमाणें नाथांच्या दर्शनास आले असतां ते त्यांच्या घराजवळ येतात तों वाटेंतच त्यांची भाव समाधि लागली! अंगावर रोमांच उभे राहिले! अष्टभाव प्रकट झाले! अपूर्व आनंद झाला! पुढें नाथांच्या घराशीं जातात तों नाथांच्या देवघरांतून ऋक्शा-खाष्टक कोणी तारस्वरांत म्हणत आहे, असें त्यांस स्पष्ट ऐकूं येऊं लागलें! येथें महाराजांच्या घरीं वेदपाठ कोण करितो, हें त्यांस कांहींच कळेना. पीरवाडींत ब्राह्मणवस्ती मुळींच नाहीं. ते देवघराचें दार लोटून आंत पाहातात तों वेदपाठ बंद झाला आणि काकांना पाहून नाथमहाराज हसूं लागले! काका खजिल झाले! त्यांनीं अत्यंत नम्र भावानें व निःशंकपणें त्यांना साष्टांग नमस्कार घातला व आपल्या अत्यंत शुद्धभावानें मी कृतार्थ झालों असें त्यांनीं दर्शविलें.

काकांना नाथ शास्त्री म्हणून म्हणत व त्यांच्याबद्दल प्रेम व आदर व्यक्त करीत. काकांचीहि नाथांचे ठिकाणीं निस्सीम भक्ति जडली. नाथ म्हणजे साक्षात् भगवान् होत, अशी त्यांची पूर्ण निष्ठा होती. त्यांचीच काय पण तेथील सर्व जडजीवांचीहि जणूं तीच निष्ठा होती. नाथमहाराज आपल्या देवघरांत रोज नित्याची आरती करीत त्यावेळच्या त्या देवघरांतील निनादानें देवावरील भाळी व त्यास लावलेले नारळ नाचूं लागत! व कधीं तर त्या भाळीवर भुजंग

येऊन तेही डोलूं लागत. पुस्तकीज्ञान आणि परमार्थसिद्धि यांचा अर्थाअर्थी काडीमात्र कार्यकारण संबंध नाहीं, याचें एक मूर्तिमंत प्रत्यंतर पीरवाडीचे संभाजी महाराज उतेकर हें होय. ते महासिद्ध पुरुष होते. 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' अशी त्यांची निष्ठा होती. व्याघ्र-सर्पादि प्राणी निर्भयपणें त्यांच्या जवळ येत व त्यांसहि त्यांचें यत्किंचितही भय नसे. अशा ह्या नाथमहाराजांवर काकांची परम निष्ठा बसली. नाथांचे घरींच कांहीं काळानें रावसाहेब कोल्हटकर हेहि घरदार सोडून राहण्यास आले. तेव्हां काकांचें तें माहेरघरच झालें. रोज सकाळसंध्याकाळ त तेथें येत, व न सांगतांच सेवा करीत. त्यांचा बाजारराहाट पहात. व सदां हात जोडून नम्र भावानें उभे असत. प्रथम प्रथम रावसाहेब त्यांना बरेच टाकून बोलत. "तुम्ही तुमचा व्यवसाय टाकून येथें कशाला येतां? तुम्हांला तुमचा संसार आहे कीं नाहीं? पुन्हां येथें असे वरचेवर येत जाऊं नका!" इत्यादि त्यांनीं पुष्कळच बोलावें. त्यावर त्यांची सुशील पत्नी राधाबाई यांनीं काकांसाठीं मध्यस्थी करावी व काकांनीं रोज येतच राहावें. असें ह चाले; आणि खरोखर काकांना गुरुदीक्षा प्रत्यक्ष नाथांनीं स्वतांच दिली असो किंवा रावसाहेबांकरवीं दिली असो, रावसाहेब आणि त्यांचें प्रेमळ कुटुंब राधाबाई या निपुत्रिक जोडप्यानें काकांना आपल्या मुलाप्रमाणेंच मानलें. आणि राधा-बाईची भावाची मुलगी आऊताई ही त्यांची मानलेली मुलगी असे. काकांचा व नाथांचा संबंध तर अनिर्वचनीयच होता. नाथ हे काकांचें सर्वस्व होतें. नाथांचा व त्यांचा इहलोकींचा वियोग झाल्यानंतर चाळीस पन्नास वर्षांनींहि नाथांचें नांव उच्चारतांच त्यांच्या चेहऱ्यावर विलक्षण तेज चमकूं लागे, डोळे प्रेमाश्रूनें भरून येत, कंठ सद्गदित होई आणि ते आम्हांस म्हणत "अहो, ते साक्षात्, भगवान् होते. त्यांचें नांव

उच्चारण्याची तरी आपली योग्यता आहे काय ?" हे शब्द उच्चारीत असतां त्यांच्या चेहऱ्यावर जें प्रेमादराचें वलय प्रकाशून राही, त्याचें वर्णन् करतां येणें शक्य नाहीं. असें हें अलौकिक सद्गुरुप्रेम ज्यांच्या भाग्यास येईल तो त्रिवार धन्य होय.

नाथांचेंहि शास्त्री महाराजांवर तसेंच प्रेम होतें. नाथांचें वात्सल्य-प्रेम अमोघ होतें. नाथ, रावसाहेब आणि काका असे तिघे मधून मधून शिलोबाचे डोंगरावर जात. तेथें एका टोंकाला शिलोबाचें स्थान आहे. तेथें देवासभोंवार उगाच लहान खोपटेंवजा निवाऱ्याची जागा केलेली असे. शिळेचाच शिलोबा, शिळेचीच बैठक, शिळेचेंच एक लोड, शिळेचीच समई, आणि शिळेचीच दिवली असा तेथें सारा शिलामयच थाट असे. तेथें नाथ शिळेच्या लोडाला टेकून बसत व समईजवळ काका बसून अध्यात्म रामायण वाचीत. जवळच रावसाहेबहि असत. 'भेटतां प्रचितीचे संत । तो एकांता परीस एकांत ।' असा तो दिव्य एकांत असे. हा त्रिमूर्तींचा अलौकिक एकांत मोडण्यास क्वचित् मोठमोठाले नाग तेथें येत व काकांच्या समयी-जवळ येऊन वर फणा करून काकांचें पुराण माना डोलवीत ऐकूं लागत. प्रथम प्रथम काकांना त्यांचें फार भय वाटे, मग नाथ मुद्दामच हंसून म्हणत " शास्त्रीमहाराज जरा दिव्याची वात सारा ! त्याला भितां वाटतें !" मग नाथांच्या आज्ञेस्तव त्या ठाणवई जवळील सापाच्या आंगावरून हात पुढें करून वात सारतांना काकांची तिरपीट उडे ! पुढें हळू हळू त्यांचा भगद्भाव जास्त वाढत चालला तसतशी त्यांची भीतीहि उडाली. सद्गुरु आपण जवळ बसून सच्छिष्याचें द्वैत भय कसें दूर करितात, पांडित्याचा आश्रय न करतां, अद्वैत कसें बिंबवितात, नुसत्या मौनानेंच शिष्यांचें अंतःकरण निःशंक कसें करितात, आपल्या वात्सल्यप्रेमाच्या लाटांनीं त्याचें

अंतरंग कसें निष्किल्मिष करून टाकतात, तें ह्या नाथ-रघुनाथ कथेंत उत्कृष्ट कळून येतें. त्याचा अधिक विस्तार येथें करितां येत नाहीं इतकेंच.

काकांच्या आणि नाथांच्या या सत्संगतींत अनेक विघ्नें आलीं. काकांचा मुलगा गेला, बायको वारली, वडील निवर्तले, यामुळें त्यांना घरीं परत जाणें भाग आलें. पण ह्यांना घरीं चैन पडेना. घरचा कारभार गोविंदभटजी नवरे नामक एका प्रेमळ व विश्वासू मित्रावर सोंपवून ते परत पीरवाडीला येऊन राहिले. याच सुमारास काकांचा दुसरा विवाह झाला. या द्वितीय कुटुंबाचें नांव रमाबाई असें होतें. त्यांस काकू अगर आई असेंहि सांप्रदायिक म्हणत. या तुकोबांच्या जीजाईप्रमाणें कजाग नव्हत्या. पण जीजाईप्रमाणें प्रापंचिक असत. यामुळें काकांना कांहीं अंशानें सोडवणूक व कांहीं अंशानें उपाधि झाली असावी, असें व्यावहारिक दृष्टीला वाटतें.

काका याप्रमाणें सुमारें अडीच तीन तपें साताऱ्यास राहिले. ते साताऱ्यास राहिले, असें म्हणण्यापेक्षां पीरवाडीसच राहिले, असें म्हणणें जास्त योग्य होईल. ते साताऱ्यास विद्यार्जनाकरितां आले. त्यांनीं कांहीं वर्षें शास्त्राभ्यास केलाहि खरा. पण अखेर तो त्यांनीं वाढविला किंवा तो ते विसरले, हें सांगणें कठीण आहे. ते चरितार्था-करितां पैसे मिळविण्यासाठीं साताऱ्यास राहिले. त्यांनीं कांहीं पैसे मिळविलेहि होते. पण त्यांची गंगाजळी ज्याच्या जवळ असे, त्याचा त्यांनींच अपहार केल्यामुळें काकांनीं घरीं काय पाठविलें असेल, तें त्यांचें त्यानांच ठाऊक! अखेर त्यांचें सुख-निधान, केवळ जीव आणि प्राण, असे रावसाहेब व श्रीनाथ महाराज हे थोड्याच अवधीच्या अंतरानें निर्याण पावले! तो प्रसंग अत्यंत दुर्धर होता! काकांनीं रावसाहेबांच्या अखेरच्या दुखण्यांत त्यांची

अत्यंत कळकळीनें सेवा केली. पुढें रावसाहेब गेल्यावर नाथमहाराज म्हणाले कीं आतां आम्हीहि लवकरच जाणार! असें म्हणून एका रात्रीं ते घोंगडी घेऊन नित्याप्रमाणें निजले ते निजरूपींच शान्त झाले! काकांना फार दुःख झालें! त्यानंतर काकांचा तेथील आधार तुटला! त्यांना घरीं जाण्याबद्दल सद्गुरूंची आज्ञा पूर्वींच झाली होती. म्हणून निरुपायानें ते धोपेश्वरीं परत आले व आपला प्रपंच पाहूं लागले. एखादी मुलगी यौवनपद प्राप्त झालें असतां सासरीं आल्यावर लज्जेनें ज्याप्रमाणें आपलें तारुण्य झांकते, एखादा धनलोभी ज्याप्रमाणें आपण मिळविलेलें विपुल धनहि छपवून ठेवतो, त्याप्रमाणें सामान्य विद्यार्थी म्हणून गेलेले काका परत जें ऐश्वर्य घेऊन आले, तें त्यांनीं बरेच दिवस कोणाला दिसूंहि दिलें नाहीं.

श्री ज्ञानदेव अमानित्वाचें व अदंभित्वाचें वर्णन करितात:—

तरी कवणेंही विषयीचें । जीवा साम्य होणें न रुचे ।
संभावितपणाचें । वोझें जया ॥ १ ॥

आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योगतेचें येतां । अंगा रूप ॥ २ ॥

तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृग जैसा ।
कां बाहीं तरतां वळसां । दाटला जेवीं ॥ ३ ॥

पूज्यतां डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सेंचि लोकां ॥ ४ ॥

तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी ।
मरणेंसी साटी । नमस्कारितां ॥ ५ ॥

लौकिकाचा उद्वेग । शास्त्रांवरी उबग ।
उगेपणीं चांग । आथीभर ॥ ६ ॥

खडाणे आला पान्हा । पळवी जेवि अर्जुना ।

* * * *

कां लपवी पण्यांगना । वडिलपण ॥ ७ ॥
आढ्य आतुडे अडवीं । मग आढ्यता जेविं हारवी ।
नातरी कुलवधु लपवी । अवयवातें ॥ ८ ॥
ना ना कृषीवल आपुलें । पांघुरवीं पेरिलें ।
तैसें झाकीं निपजलें । दानपुण्य ॥ ९ ॥
बरिवरि देहो न पूजी । लोकांतें न रंजी, ।
स्वधर्म वाग्ध्वजीं । बांधो नेणें ॥ १० ॥
शरीरभोगाकडे । पाहतां कृपण आवडे ।
येऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥ ११ ॥

हें वर्णन जणूं काकांनांच उद्देशून केलें आहे, इतकें तें त्यांच्या वृत्तीस साजत आहे.

ज्यांनीं विद्याधन मिळविलें त्यांनीं निर्धन असावें, ज्यांनीं भक्ति संपादन केली, त्यांनीं आपत्तींत राहावें, ज्यांनीं देवऋण, पितृऋण, ऋषिऋण हीं ऋणत्रयें फेडलीं, त्यांची मान लौकिक ऋणभारानें वांकवावी, ज्यांनीं सारेच सद्गुण लुबाडले त्यांनीं निंदकांस निराधार केल्याबद्दल निंदकांनीं त्यांचेवर मत्सरानें आणखी चिडून जावें, ज्यांनीं प्रपंचावर असंगशस्त्र उगारलें त्यांच्यावर प्रपंचानें जणूं सूड घेण्यास उठावें, ही सारी भगवल्लीला आहे! यांतून घेणारांनीं जो बोध घ्यावयाचा तो घ्यावा. यांत "देव भक्तालागीं, करूं नेदी संसार ॥" हें वैषम्य आपल्याला वाटतें तितकें त्या भक्तांनाच वाटत नाहीं, हें मर्म लक्षांत घेण्यासारखें आहे.

काकांचें नुसतेंच दारिद्र्य नव्हतें, केवळ द्रव्याचा अभावच नव्हता, तर मागें ब्रह्मस्वाचा तगादाहि होता. त्यांच्या पुराणिकपणाच्या

वृत्तींतून अगदीं गरिबीनें सुद्धां दोन माणसांचेंहि पोट भरणें शक्य नव्हतें. त्यांच्या अयाचित भिक्षुकीच्या वृत्तींत दिवसां आणा दोन आणे मिळण्याची पचाईत होती! ते रोज सकाळीं विद्यार्थ्यांना संस्कृत भाषा, शास्त्रें, व पुराणें शिकवीत, पण त्याचें मूल्य ते घेत नसत. अशा स्थितींत धोपेश्वराच्या वनराईतून कांहीं पत्री खुडून आणावी, त्यांतील कांहीं देवाला वाहावी, राहील ती उकडून खावी! फार तर फणसाची भाजी व भाजलेल्या आठ्या खाऊन गुजारा करावा! असेच कित्येक दिवस त्यांना काढावे लागत. त्यावेळीं धोपश्वरीं सात उत्कृष्ट वैदिक ब्राह्मण असत. त्यांस सप्तर्षि म्हणत. त्यांत काकांची प्रमुखत्वानें गणना होई. पण त्या मानानें त्यांना प्राप्ति नसे. इतरांना जें कर्म करायला अर्धातास पुरे, तें कर्म करण्यास काकांना एक तासहि पुरत नसे. ते आपल्या घरीं नित्यकर्म करीत असोत किंवा बाहेर कोठें यजमानकृत्य करीत असोत, मंत्रांचा वर्णोचार स्पष्ट व सावकाश करून सारें कर्म यथास्थित करण्यास त्यांना फार वेळ लागे. जी गोष्ट आन्हिकाची तीच पुराणाची. ते पोथी अति स्पष्ट व सावकाश वाचीत. त्यांचे ते उच्चारलेले शब्द अति मधुर आणि ओजस्वी वाटत. त्यांच्या साध्या शब्दोच्चारांतहि विशेष शक्तिनिक्षेप आहे, असें कोणासहि कळून येई. त्यांचें श्रोत्यांकडे फारसें अवधान नसे. त्यांचे खरे श्रोते कोण असत तें त्यांचें त्यानांच ठाऊक. पणं आपल्याहून कोणी तरी दुसरे श्रोते ह्यांच्यापुढें आपल्याला अदृश्य असलेल्या सृष्टींत असावेत असें पाहणारास वाटे. मग ते त्यांचे श्रीसद्गुरु असोत किंवा त्यांचीं अन्य इष्टदैवतें असोत. एकदां अध्यात्मरामायणांतील अहिल्योद्धाराचा अध्याय वाचून ते त्याचा साधा केवळ शब्दार्थच सांगत होते. त्यावेळीं हा लेखक तेथें होता. अहल्येनें रामाची केलेली स्तुति सांगण्याचा प्रसंग आला, तेव्हां त्यांचा

चेहरा इतका तेजःपुंज, इतका प्रसन्न, दिसूं लागला, आणि त्यांच्या नेत्रांत इतकें प्रेम आणि वाणींत इतकें माधुर्य लोटलें कीं, त्यावेळीं ते साक्षात् प्रभुरामचंद्रांना पुढें पाहात आहेत. व त्यांची आपणच स्तुति करीत आहेत, असेंच सर्वांना वाटलें ! ज्यांत पांडित्य नाहीं, ज्यांत कोटिक्रम नाहीं, ज्यांत मुद्दाम रसपरिपोष करण्याचा मुळींच प्रयत्न नाहीं, ज्यांत केवळ शब्दार्थापलीकडे यत्किंचित पाल्हाळ नाहीं, त्या साध्या पुराणांत ही अजब जादु कशी उत्पन्न होते, तें अनुभवीच जाणोत !

पोथीचें प्रत्येक अक्षर डोळ्यांनीं निरखून मग वाचावें व तें प्रत्येक अक्षर कानानें ऐकावें, त्या वांचून पुढील अक्षरावर दृष्टि नेऊं नये, अशी त्यांची वाचनाची पद्धत असे. नेत्र, श्रवण, वाणी आणि मन यांची एकतानता त्यांच्या वाचनांत अखंड सुरू राही. अध्यात्मरामायण वाचणें हेंच त्यांना महाव्यसन होतें. दिवसां रात्रीं, रिकामपण मिळेल तेव्हां आणि मिळेल तितकें शुचिर्भूतपणें धाबळी नेसून श्रीसद्गुरूंच्या पादुकांपुढें पाटावर बसून ते रामायण वाचीत आहेत, असें दिवसासच काय; रात्रीं अपरात्रींहि आढळून येई. त्यांच्या नित्य पठणाच्या अनुक्रमांत रोज एक अध्यायाचा अर्थ सांगावयाचा असे. तो अर्थाचा अध्याय सांगण्याची वेळ येई, त्यावेळीं जवळ कोणी ऐकण्यास आहे नाहीं, त्यावेळीं वेळ कोणची आहे, दिवस आहे कीं अपरात्र आहे, याचा कांहीं एक विचार न करितां देवाजवळ बसून त्यांचा नित्यक्रम अस्खलित सुरूं असे. त्यांच्या उपासनेंतील बाह्य साधनांपैकीं हेंच एक साधन लोकांच्या लक्षांत येण्यासारखें होतें. पण हें एकच साधन ते करीत त्या पद्धतीनें जर कोणी आचरलें, तर तो या जन्मींच मुक्त झाला पाहिजे, असा कोणाचाहि विश्वास बसेल, अशी त्यांची साधनानुष्ठानांतील अढळ व दृढ एकनिष्ठा असे.

याप्रमाणें काका महाराज आपली थोरवी लपवून धोपेश्वरीं राहात असतां दूरस्थ संतांनीं त्यांना उघडकीस आणलें. आळंदीचे श्रीनृसिंह-सरस्वतींचा दोन वर्षे सत्समागम घडलेले एक कोंकणचे गृहस्थ परत कोंकणांत यावयास निघाले, तेव्हां त्यांना त्या सत्पुरुषाचा वियोग दुःसह होऊन त्यांनीं श्रीनृसिंहसरस्वतींस आतां माझी वाट काय असें विचारलें. तेव्हां स्वामी म्हणाले कीं, " धोपेश्वरीं काका पुराणीक म्हणून एक महासाधु आहेत त्यांना शरण जा ते तुला कृतार्थ करतील. " या गृहस्थाचे कोंकणचे उपाध्यायच काका होते. पण त्यांची अशी योग्यता आहे, हें त्याच्या गांवींहि नव्हतें. यामुळें त्याची प्रथम खातरीहि पटेना. पण स्वामीनीं विशेष खातरजमा केली* व कांहीं खुण अथवा भेट म्हणून ज्ञानोबारायांचा अंगारा एका पुडींत बांधून त्यांचेजवळ दिला. हे गृहस्थ त्याप्रमाणें राजापुरीं आलें, तेव्हां रोज काकांचे भेटीस जात. पण हे आपले साधे भोळे उपाध्ये, यांचेजवळ गोष्ट तरी कशी काढावी, हा त्यांना संकोच वाटे. एक दिवस काकांनींच त्यांस विचारलें कीं " आपण रोज मजकडे येण्याची तसदी कां घेतां ? " ही योग्य संधी आहे, असें पाहून त्यांनीं ज्ञानोबारायांचा अंगारा पुढें ठेवला व स्वामींचा निरोप त्यांस कळविला. तेव्हां तो अंगारा त्यांनीं मोठ्या आदरानें घेतला व मस्तकीं धारण केला. आणि नम्रपणानें म्हणाले:—" अहो, मी तुमचा उपाध्याय. मजमध्यें तुम्हीं म्हणतां तें सामर्थ्य कोठचें ? तसें असतें तर मग मी भीक कां मागतों ? पालखींतच बसलों असतों. मी गरीब ब्राह्मण. स्वामी महाराजांनीं तुमचे जवळ विनोद केला, झालें." पण अशा उडवाउडवीच्या उत्तरांनीं तो गृहस्थ

* काका पुराणीक ना सामान्य । तो अंजनीचा नंदन ।
आला अवतार धरून । जगदुद्धार करावया ॥ ५६।३३
भक्तिसारामृत.

बधेना. स्वामी असा भलताच विनोद करणार नाहींत, असा त्याला भरंवसा होता. शिवाय रोज उपाध्येबोवांच्या भेटीस येतां येतां त्यांच्या पायांवर डोकें केव्हां ठेवीन अशीहि त्याची अंतःप्रेरणा उत्कट होऊं लागली होती ! म्हणून त्यावेळीं त्यांनीं निर्धारानें काकांचे पाय धरलेच. आणि त्यांच्याकडून उपासना मिळविली. काकांनीं त्यांस प्रथम गुरुचरित्र आणि मागून काशीखंड वाचावयास सांगितलें. त्या ग्रंथांच्या पठणानें व श्रीसद्गुरुकृपेनें त्या गृहस्थास वरचेवर दृष्टांत होऊं लागले व त्याची पारमार्थिक प्रगति जलद झाली.

यानंतर असाच दुसरा एक साधक श्रीअक्कलकोटच्या स्वामींनीं काकांस शरण जाण्याकरितां त्यांचेकडे पाठविला व त्यांस सांगितलें कीं, ते मारुतिराय आहेत. या गृहस्थांची काकांचे ठिकाणीं परम निष्ठा बसली. पुढें थोडेच दिवसांत त्यांचा अंत झाला. पण अंत-समयीं काकांचे पुण्यस्मरणांत, त्यांचे सानिध्यांत मी आहें, असा त्याला साक्षात्कार होऊन त्याला फार आनंदांत मरण आलें.

ह्यानंतर काकांची प्रसिद्धि फार जलद झाली. आरंभीं हें काम कोंकणच्या एका भावनाप्रधान अनंत देसाई नामक तरुणानें केलें. त्यानें काकांची राजापुरास व मुंबईस विशेष प्रसिद्धी केली. मुंबईस त्यांच्या नांवानें त्यानें एक संस्था काढली. व तेथें एक भजनसंप्रदाय सुरू केला. त्यांत त्याचीं भाषणें होत. तो चांगला उपासक व उत्कृष्ट वक्ता होता. यामुळें काकांना पडद्याआडच ठेवून त्यांनीं कांहीं काळ मुंबईच्या बऱ्याच मंडळीवर चांगलीच छाप टाकली. त्यांतच दत्तोपंत सांडू व तात्यांचे मेव्हणे आत्मारामपंत खेर वगैरे मंडळी होती.

याच तरुणानें राजापूरच्या सुप्रसिद्ध भागवतांच्या घराण्याशीं काकांचा संबंध घडवून आणला. भागवतांचें घर हें खरोखरीच

भागवतांचेंच होतें. राजापुरास श्री दांडेकर महाराज, श्री सूर्याजी, असे कांहीं संत भागवतांचे घरीं जाऊन येऊन असत. भागवतांच्या मावशीबाई या एक अत्यंत प्रेमळ व सत्संगप्रेमी बाई होत्या. त्यांना संतसेवेची अति आवड होती. त्यांच्या पुण्याईनेंच या घराण्याला काकांची जोड मिळाली. मावशीबाईंचे चिरंजीव राजापुरचे सुप्रसिद्ध बाबुराव भागवत वकील हे काकांचे फार लाडके होते. भागवतांचें घर म्हणजे संतांची पुण्यभूमि असें त्या घराचें माहात्म्य आहे.

या घरीं एकोणिसाव्या शतकांत अनेक संतलीला घडलेल्या आहेत. येथें येणारे श्री रामौजा सुतार, हे विक्षिप्त उन्मत्त वृत्तीचे होते. ते एकदां बाबुराव भागवतांना आपल्या नेहमींच्या विक्षिप्त वृत्तींत असतां म्हणाले कीं, तुझा गुरु कोठें आहे तो माझ्यापुढें आणून दाखव. त्यानंतर काकांची व बाबूरावांची भेट झाली. तेव्हां त्यांनीं आपण होऊनच रामौजा काय म्हणाले ? त्यांनीं काय विचारलें ? अशी बाबुरावांजवळ चवकशी केली ? बाबुरावांनीं झालेली हकीकत सांगितली. तेव्हां काका त्यांस एकांतांत म्हणाले कीं, त्याला सांगा, माझा गुरू त्रैलोक्याचा धनी आहे 'तुझी ताकद असेल तर त्याला बोलवून घे.' काकांच्या तोंडून अहंतेचे उद्गार निघणें अशक्यच होतें. यावेळीं त्यांचा काय हेतु असेल तो त्यांसच ठाऊक, मात्र सर्वाधिष्ठाता याच भावनेनें व नामोच्चारानें ते आपली पूजा करून घेत. दुसरे सूर्याजी नामक मोठे तपस्वी होते. ते दिवसभर एकसारखे सूर्यबिंबाकडे पहात तपश्चर्या करीत. हे तपस्वी सिद्ध होते. ते सांगत कीं, या आभाळाखालीं काका इतका प्रचंड सिद्ध नाहीं. भागवतांकडील तिसरे सत्पुरुष दांडेकर महाराज हे कुंभारगल्लीचे स्वामी व आळंदीचे नरसिंहसरस्वति यांचे गुरुबंधु होते. या दांडेकर

भटजींकडून व कुंभारगल्लीचे स्वामी यांचेकडून बाबूराव भागवत यांस काकांचें महात्म्य कळलें होतें. एकदां बाबूराव कुंभारगल्लीचे स्वामींचे दर्शनास गेले असतां, ते समोरून हातांत फुलें घेऊन येत होते. बाबुरावांनीं त्यांच्या पायांवर डोकें ठेवतांच त्यांनीं आपल्या हातांतील फुलें बाबुरावांच्या डोक्यांवर टाकलीं व त्यांचा कान धरून ते त्यांस म्हणाले कीं, धोपेश्वरेचे काका पुराणिक महासाधु आहेत. त्यांस टाकून मजकडे कशाला आलास ? हे भागवत सांडूचे सोयरे होत. याशिवाय काकांचे एक एकनिष्ठ सेवेकरी बाबूराव करंबेळकर हे दत्तोपंताचे मेव्हणे होते. दत्तोपंत हे मुंबईच्या श्री वाग्देवनामक जेजुरीच्या वारकऱ्याचे भक्त होते. प्राचीन समर्थ पंचकांप्रमाणें या अर्वाचीन श्रीसमर्थपंचकांत श्री समर्थ काका पुराणिक, दांडेकर महाराज, रामौजा, सूर्याजी आणि श्री वाग्देव असे संत वाटल्यास मानावे. अशा अनेक संबंधानें दत्तोपंत सांडू हेहि काकांकडे ओढले गेले. ते त्यांस शरण गेले. त्यांनीं त्यांस मुंबईस आणलें व त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ त्यांच्या नांवानें अगोदरच स्थापन झालेल्या संस्थेनें फार मोठा उत्सव केला.

त्यानंतर श्री समर्थ काका पुराणीक यांस जें थोडेंसें व्यावहारिक ऋण होतें तें मुंबईकर मित्रांच्या साह्यानें पण आपण पुढाकार घेऊन फेडण्याचें श्रेय दत्तोपंतांनीं मिळविलें. या गोष्टीस काका मुळींच कबूल होत ना. ते म्हणत माझें कर्ज इतरांनीं काय म्हणून फेडावें ? मुंबईचे प्रापंचिक लोक कसाबसा प्रपंच करणार. त्यांना अशी भलतीच तसदी देऊं नये. काका कांहीं केल्या ऐकतचना तेव्हां दत्तोपंतांना फार वाईट वाटलें. ते मुद्दाम त्या कामासाठीं मुंबईहून धोपेश्वरीं आले होते. त्यांनीं अत्यंत निराश होऊन अखेर काकांच्या पायांवर डोकें ठेवलें! ते हतगर्व झाले! त्यांनीं डोळयांत आंसवें आणून विनविलें कीं, श्री जर ही सेवा करून घेणार नाहींत तर मी मुंबईस तसाच

परत जाऊन तोंड काय दाखवूं? त्यांना अतिच वाईट वाटलेलें पाहून काकांनीं मी विचार करून उद्यां काय तें सांगेन, असें सांगितलें. नंतर श्रीरामकृष्ण आपल्या कालीमातेला विचारीत तशी काकांनीं आपल्या इष्ट देवाची जणूं संमति घेतली व तुम्हांला काय वाटेल तें करा, अशी दत्तोपंतांस अनुज्ञा दिली. दत्तोपंतांच्या गुरुभक्तीचा हा एक विजयच म्हणावयाचा.

दत्तोपंतांच्या मध्यस्थीनें श्री काकामहाराजांशीं तात्यांनीं धोपेश्वरीं जाऊन शिष्यत्वाचें नातें जोडलें व त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्यांना सर्व सांप्रदायी मंडळीसह मोठ्या थाटानें पनवेलीस आणलें. गुढ्या तोरणें उभारून त्यांच्या स्वागताचा महोत्सव केला. त्यांची यथाशास्त्र महापूजा केली. अशारीतीनें तात्यांच्या चरित्रांत क्रान्ति घडवून आणणारा, व त्यांच्या उद्योगशील व धर्मशील मनाला भावि दुःख-दायक संकटकालांत मोठाच आधार मिळून, त्या श्रीसद्गुरुसमर्थांच्या सुस्वागताचा सुयोग व मंगल प्रसंग पुढें मिती माघ शु० ११ संवत १९५९ रोजीं घडून आला. हा श्रीधूतपापेश्वर कारखान्याच्या आज-पर्यंतच्या आयुष्याचा मध्यकाल होय.

ऐसा पुरुष धारणेचा। तोचि आधार बहुतांचा।
दास म्हणे रघुनाथाचा। गुण घ्यावा॥

दासबोध





# प्रकरण १९ वें.

## महापुरुषाचा आश्रय.

होय अदृष्ट आपैतें । तैं वाळूचि रत्नें परते ।
उजू आयुष्य तैं मारितें । लोभु करी ॥ २२ ॥
आधणीं घातलिया हरळ । होती अमृताचे तांदुळ ।
जरी भुकेची राखे वेळ । श्री जगन्नाथु ॥ २३ ॥
तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगीकारु ।
तैं होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥ २४ ॥
पाहा पां काई नारायणें । तया पांडवांचें उणें ।
कीजेचि ना पुराणें । विश्ववंद्यें ॥ २५ ॥

ज्ञानेश्वरी अ. १५

संकटकाळीं भक्तांची राख श्री शिवगुरु कशी करितात, तें ज्ञानोबा-रायांनीं ज्ञानेश्वरीच्या पंधराव्या अध्यायांचे आरंभीं वरीलप्रमाणें वर्णिलें आहे. तात्यांच्या संकटकालाची सूचना वाचकांस दिली आहे. तो संकटकाल प्राप्त होण्याचे पूर्वींच श्रीधूतपापेश्वरांनीं आपले एक दिवाण ज्ञानदीप घेऊन श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिराचे दिवाणांना मार्गदर्शक

म्हणून नियोजित केले. श्रीसद्गुरु ईश्वरापेक्षांहि मोठे. ईश्वरास जर कांहींच अशक्य नाहीं, तर श्रीसद्गुरूंस अशक्य तें काय ? सामान्य जनांची समजूत अशी असते कीं, ज्यांच्या ठिकाणीं अशक्य शक्यतेस आणण्यांची अलौकिक शक्ति असते, तेच महापुरुष होत. चमत्कारावांचून नमस्कार नाहीं. असा हा जनस्वभाव आहे. श्री समर्थ रामदासांचें एक चरित्र, म्हणजे जवळ जवळ त्यांच्या चमत्कारांचीच यादी आहे. पण खुद्द श्री समर्थ रामदासांनीं अशा चमत्कार करून दाखविणाऱ्या पुरुषांबद्दल जनस्वभाव गोसावी या प्रकरणांत फारसा आदर दर्शविलेला नाहीं.

गुरु भविष्य सांगती । रेड्याकरवीं वेद म्हणविती ।
गधड्याकरवीं पुराणें सांगविती । सामर्थ्य बळें ॥ ६३ ॥

एक गोसावी भाग्य देती । एक गोसावी पुत्र देती ।
गोसाव्यानें नवस चालती । नाना प्रकारें ॥ ६४ ॥

जें जें मनामध्यें चिंतावें । तें तें गोसाव्यानीं जाणावें ।
चुकलें ठेवणें काढून द्यावें । नाना प्रकारें ॥ ६५ ॥

हारपलें सांपडून द्यावें । चोरटें तात्काळ धरावें ।
थोडें अन्न पुरवावें । बहुत जनांसी ॥ ६७ ॥

ऐसें वर्ततें लोकीं । येणें सार्थक नव्हे कीं ॥
आध्यात्मविद्या विवेकी । जाणतसे ॥ ६८ ॥

पदार्थज्ञानाचा बडिवार । याहून थोर ईश्वर ।
ऐसे प्राणी लहान थोर । सकळ जाणती ॥ ७० ॥

याचप्रमाणें श्रीरामदासस्वामीनीं आपल्या पांचव्या दशकांत यंत्रगुरु, मंत्रगुरु, तंत्रगुरु, स्वप्नगुरु, दीक्षागुरु, प्रतिमागुरु, आपला आपणच गुरु, तसेच देवगुरु, कुलगुरु, यातिगुरु, जगद्गुरु, राजगुरु, विद्यागुरु,

आणि भिन्न कला व धंद्यापरतें भिन्नगुरु असे अनेक प्रकार लिहून अखेर–

असो ऐसे उदंड गुरु । नाना मतांचा विचारु ।
परी जो मोक्षदाता सद्गुरु । तो वेगळाची असे ॥ ७२ ॥
नाना सद्विद्येचे गुण । याही परी कृपाळूपण ।
हें सद्गुरूचें लक्षण । जाणिजे श्रोतीं ॥ ७३ ॥

असें म्हटलें आहे.

पण समर्थ रामदासांच्या आत्मचरित्रांत

निद्रा केली तेथें श्रीरामें उठवूनी ।
तोचि मंत्र कानीं सांगितला ॥

असें लिहिलें आहे. त्यावरून तुकोबांचे स्वप्नगुरु आणि जनार्दन-स्वामींचे देवगुरु याच सदरांत रामदासांचेहि गुरु येतील हें उघड आहे.

एका रामदासी वाङ्मयांत सद्गुरूंचें वर्णन भिन्नभिन्न तऱ्हेनें आढळतें. उदाहरणार्थ:—

(१) हरिहरब्रह्मादिक । नाश पावती सकाळिक ।
सर्वदा अविनाश एक । सद्गुरुपद ॥ २९ ॥
म्हणोनि सद्गुरु वर्णवेना । हे गे हेचि माझी वर्णना ।
अंतर स्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती ॥ ३१ ॥

दासबोध १।४.

(२) जो ब्रह्मज्ञान उपदेशी । अज्ञान अंधार निरसी ।
जीवात्मया शिवात्मयासी । ऐक्यता करी ॥ ५।२।९

(३) तैसी मूर्ति दृष्टि पडो । तैशापायीं वृत्ति जडो ॥ १ ॥
ब्रह्मचारी सूत्रशिखा । पाईं शोभती पादुका ॥ २ ॥
कटीं अडबंद कौपिन । कंठीं तुळसीमणि भूषण ॥ ३ ॥
दिव्य मुख दिव्य नेत्र । भाळीं आवाळू सुंदर ॥ ४ ॥
रामदास दिव्यनाम । सखा ज्याचा आत्माराम ॥ ५ ॥

ऐशा सद्गुरुचरणावरी। किंकर लोळे दासापरी ॥ ३ ॥

हे तीन वर्णनाचे प्रकार एकाच सद्गुरूबद्दल असले तरी सिद्ध, साधक आणि व्यावहारिक अशा त्रिविध दृष्टीनें भिन्न भिन्न दिसणारें हें सद्गुरुदर्शन आहे.

यावरून एकच सद्गुरुमूर्ति साधकांचे अधिकारभेदानें त्यांस भिन्न फळ देते, म्हणजे जी व्यक्ति 'साक्षात् परब्रह्मरूप' असते, तीच मायेचा किंचित् आश्रय करून सच्छिष्यास मोक्षप्रद होते, आणि तीच व्यक्ति लोकसंग्रहकारी होत्साती मंदाधिकारी शिष्यांची प्रापंचिक चिंता दूर करून लौकिक आणि अलौकिक असे व्यवहार आणि चमत्कारहि दाखविते, व साधकांची धर्मभावना दृढ करते, असें म्हणावें लागतें. ते व्यवहार आणि चमत्कार त्यांचेकडून बुद्धिपूर्वक होतात असें न मानतां, ईश कार्य असें त्यांचें जें शरीर त्या शरीराचीं सूत्रें ईश्वराच्या हातीं जाऊन जगदुद्धारासाठीं ईश्वरच त्यांच्या शरीराकडून योग्य ते व्यवहार करवितो, असें म्हणणें जास्त योग्य ठरेल. कारण जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं स्वदेहबुद्धिपूर्वक चमत्कारादि कर्मप्रवृत्ति आणि व्यवहार संभवत नाहीं.

गृहस्थांनीं महापुरुषाचा आश्रय कशासाठीं करावयाचा हा एक चिंतनीय प्रश्न आहे. परमार्थलाभ करून देण्यांतच सद्गुरूंचें वैशिष्ट्य आहे. त्यापरता दुसरा लाभ नाहीं. आणि त्याशिवाय दुसरी कशाचीच इच्छा सद्गुरूंजवळ करूं नये, हाच श्रेष्ठ मार्ग वाटतो. महावाक्याचे श्रवणानें त्यांतील तत्त्वबोध हा सद्गुरूंवांचून कळणेंच शक्य नाहीं, असें अध्यात्मशास्त्र सांगतें, यास्तव त्यासाठींच सद्गुरूंना शरण जावयाचें असतें. साधनचतुष्टयसंपन्न पुरुषांनीं विवेक, वैराग्य, मुमुक्षा हीं प्राप्त झाल्यानंतर आपला ज्ञानदीप सद्गुरूंकडून पेटवून घ्यावा, असेंच शास्त्ररहस्य दिसतें. पण सांप्रदायिकांचा व्यवहार याहून भिन्न असतो.

सद्गुरूंना शरण जाणारे व शरण गेलेले जे सहस्रावधि सांप्रदायिक दिसतात, ते धार्मिक प्रवृत्तीचे असले तरी त्यांच्या ठिकाणीं साधन-चतुष्टयसंपन्नता हजारांत एकाचे ठिकाणींहि आढळत नाहीं. सद्गुरूं-कडून तत्त्वमसि महावाक्याच्या केवळ श्रवणमात्रानेंच कृतार्थ होण्याची योग्यता त्यांच्यांत आरंभीं तरी दिसत नाहीं. या सांप्रदा-यिकांत कित्येक तर अनीतिमान्, पापी व अशुद्ध अंतःकरणाचेहि स्त्री-पुरुष आढळतात. मूर्तिकाराचे चित्रशाळेंत ज्याप्रमाणें मुळींच न घडलेल्या वेड्यावांकड्या पाषणापासून तों रंगविलेल्या व घोंटलेल्या अत्यंत सुंदर मूर्तीपर्यंत निरनिराळे प्रकार दिसतात, तसाच व्यवहारांत सद्गुरुसंप्रदायांत दिसतो.

या विचारसरणींत सांप्रदायिक शिष्यांच्या ठिकाणीं वेळोवेळीं उद्भवणाऱ्या कामना व चिंता त्यांनीं सद्गुरूंस निवेदन करणें, या सर्वत्र आढळणाऱ्या प्रकाराची संगति लागते. शुद्ध परमार्थमार्गा-पलीकडे सद्गुरूंजवळ कांहींच बोलावयाचें नाहीं, अशा बाण्याचे कांहीं सांप्रदायिक असतातच. पण सद्गुरू हेच जर आपले मायबाप आहेत, तर ज्याप्रमाणें बालबुद्धि आईजवळ हट्ट धरून आपले सर्व प्रकारचे लाड पुरवून घेते, त्याप्रमाणें सद्गुरुमाउलीजवळ आपल्या कामनिक तक्रारी नेऊन त्या दूर करून घेण्यास काय हरकत आहे ? सद्गुरूंस योग्य वाटल्यास ते त्या दूर करतील, अगर करणार नाहींत, अशी एक विचाराची बाजू आहे.

तसेंच जगतांतील मोठमोठालीं कार्यें व ऋतु पूर्वीं ज्याप्रमाणें वसिष्ठादि महापुरुषांच्या प्रेरणेनें व सल्ल्यानें होत, त्याप्रमाणें नेहमींच घडत राहाणें, हें अयोग्यच नव्हे, तर आवश्यकहि आहे, असा आणखीं एक दुसराहि मुद्दा चिंतनीय आहे. ह्या दुसऱ्या मुद्याचा विचार करितांना असे विचार मनांत येतात कीं, हे श्रीगुरु जगच्चा-

लक ईश्वराचे हस्तक अथवा कारभारी–कामगार असतात काय ? तसें असल्यास त्यांच्याकडे जी कामाची विभागणी केलेली असते, ती विषयवार, वर्गवार, किंवा निरनिराळ्या व्यक्तींपुरती असते? ईश्वराच्या समाजरचनेंत लोकशिक्षणाकरितांच ईश्वरानें नेमलेल्या ह्या अधिकाऱ्यांची नेमणूक जर विषयवारी असेल, तर कोणत्याहि शास्त्रांत संशोधन करून ज्ञानविकास करणारे शास्त्रज्ञ हेहि गुरुमार्गातील मार्गदर्शक अधिकारीच ठरतील. ती नेमणूक जर एका धर्मविषयांतच वर्गवारीनें असेल तर पाद्री, मुल्ला, भिक्षु, पुरोहित, महंत, आचार्य, इत्यादि नेमणुका ह्याच एका शिक्षणसंस्थेंतील ठरतील. पण आपण ज्यांस संतसद्गुरु मानतों ते या दोन्ही वर्गात येत नाहींत. आपण ज्यांस साक्षात्कारी संत किंवा श्रोत्रीय व ब्रह्मनिष्ठ सद्गुरु मानतों, त्यांच्या पायांशीं निरनिराळ्या प्रांतांतील, निरनिराळ्या जातींतील, भिन्न अधिकाराचीं मांणसें एकत्र झालेलीं आढळतात. तींच माणसें त्याच संतांचे पायाशीं एकत्र कां व्हावीं, याचें उघड कारण कांहींच सांगतां येत नाहीं. हा जो सांप्रदायिकांचा संयोग हा पूर्वघटितच असावा असें अनुमान होतें. म्हणजे कोणत्या संतांनीं कोणते साधक आपल्या ताब्यांत घ्यावे व कोणत्या साधकांनीं कोणत्या संतास शरण जावें, हे नेमानेम ईश्वराचे घरीं ठरलेलेच असावे, असें वाटतें. यामुळेंच श्रीरामकृष्ण परमहंस आपल्या नियतशिष्यांची वाट पहात होते. यामुळेंच श्रीतुकोबारायांनीं श्री शिवछत्रपतीस आपणच कृतार्थ न करितां रामदासाकडे पाठविलें. यामुळें श्रीसद्गुरु काकामहाराज यांनीं आपल्या एका मुलास करवीरचे कुंभार गल्लींतील स्वामी व दुसऱ्यास श्री. दांडेकर महाराज यांस शरण जाण्यास सांगितलें. यामुळेंच श्री अक्कलकोटचे स्वामी, आळंदीचे श्री नृसिंहस्वति व कुंभारगल्लीचे स्वामी यांच्याकडे आलेले कित्येक साधक त्यांनीं श्री काकामहाराजांकडे पाठविले.

कांहीं असो, ज्याप्रमाणें एका कुटुंबांतील किंवा एका राष्ट्रांतीलहि माणसांचे लागेबांधे पूर्वघटित असावेत असें अनुमान होतें, त्याच अनुमानानें विचार करितां तात्यापंतोजींच्या शाळेंतील बिगारीचे वर्गापासून तों हिमालयांतील सिद्ध संघापर्यंत गुरुशिष्यांची सारी घटना प्राक्कर्माप्रमाणें ईश्वराचे नियतींत ठरलेलीच असली पाहिजे, असें दिसतें. मग या गुरुसंप्रदायांत धर्म, व्याध आणि चोखा मेळा, जनी, वेणाबाई आणि मुक्ताबाई यांपासून तों श्री गुरुदत्त आदिनाथ प्रभु रामचंद्र, मदालसा, चूडाला, वाचक्नवी या प्राचीन दिव्य व्यक्तींपर्यंत, तसेंच व्यावहारिक दृष्टीनें उजळणीच्या यत्तेवरील शिक्षकापासून कुलगुरूपर्यंत, गांवच्या नापितापासून धन्वंतऱ्यापर्यंत अथवा तात्या पंतोजीपासून भास्कराचार्यापर्यंत शिक्षणाचे निरनिराळे केंद्र असूं शकतील असें म्हटलें तर तो केवळ विनोदच होईल काय ?

आधुनिक विद्वानांत थिऑसफिस्टांनीं गुरुमार्गावर बरेंच विस्तृत वाङ्मय प्रसिद्ध केलें आहे. तरीपण याज्ञिकांच्या इंद्रवरुणादिदेवता ज्याप्रमाणें आकाशाच्या मेघडंबरींत कोठें असतील त्याचा निश्चय होत नाहीं, त्याप्रमाणें थिऑसफिस्टांच्या महात्म्यांच्या यशाच्या धवलगिरी हिमालयांत कोठें लुप्तप्राय आहेत, त्याबद्दलहि प्रत्यक्षाची माहिती असावी तितकी उपलब्ध नाहीं. तसेंच त्यांच्या गुरुमार्गांत सृष्टिचालकांचें जें एक प्रचंड अधिकारमंडळ असल्याचें दर्शवितात. तशा प्रकारच्या गुरुसंघाचा संतांच्या वाङ्मयांत व त्याहि पूर्वीच्या ऐतिहासिक वाङ्मयांत फारसा कोठेंच मागमूस दिसत नाहीं. हें आश्चर्य होय. थिऑसफिस्टांचें गुरुमार्गावरील वाङ्मय मी फारसें वाचलेलें नाहीं. यामुळें तत्संबंधीं मला येथें अधिक कांहींच लिहितां येत नाहीं. माझ्या नजरेपुढें हिंदुधर्मांतील जे संप्रदाय आहेत, त्याहून त्यांचा गुरुमार्ग व गुरुपरंपरा या अत्यंत भिन्न असल्यामुळें त्यांच्या

मार्गाचें दिग्दर्शन करण्यापलीकडे मी येथें अधिक कांहींच लिहित नाहीं. स्थूलमानानें इतकें मात्र म्हणतां येईल कीं, त्यांचा गुरुमार्ग त्यांचे आजचे जगद्गुरु जे कृष्णमूर्ति यांच्या उपदेशांतील छायेनें फारच आच्छादित झाला आहे. किंबहुना नाहींसा झाला आहे, आणि पूर्वी जो प्रसिद्धसा वाटत होता, त्यांचेंहि धोरण वैयक्तिक धर्मापेक्षां-मुक्तीपेक्षां-लोकसंग्रहाकडे व मानवोन्नतीकडे अधिक दिसत होतें.

तात्पर्य, निरनिराळे मानववंश व त्या वंशांत झालेले जगद्गुरूंचे अवतार ह्या गुरुमार्गाच्या अतिदीर्घ वर्तुळापासून तों एखाद्या भाविक उपासकाच्या भोंवतीं जमलेल्या पांच दहा गणांपर्यंत गुरुमार्गाचीं लहान मोठीं वर्तुळें आढळतात. मग, हीं वर्तुळें म्हणजे कित्येक कूपमंडुकांचे अज्ञानाचे तट आहेत, किंवा भवसागर पोहून जाण्याचीं हीं वलयें आहेत, याबद्दल तिऱ्हाईत चिकित्सकांस शंका येते. पण पुष्कळ वेळां असें घडतें कीं, या वर्तुळांत आपणहि शिरावें किंवा त्यापासून दूर फटकून राहावें, याबद्दल गंभीरपणानें विचार करून निश्चय ठरण्याचे पूर्वीच कर्मधर्मसंयोगानें लोक यांपैकीं एकाद्या चक्रांत ओढले जातात, ते सांप्रदायी बनतात. मग त्यांची सांप्रदायिक निष्ठा कितीहि उथळ अगर खोल असो.

वर जो गुरुमार्गाचा व्यापक दृष्टीनें विचार केला, त्यांत आणखी एक भाग विचारांत घेण्यासारखा राहिला; तो भाग म्हणजे एकलव्याचे मातीचे द्रोणाचार्य किंवा अवधूतांचे चोवीस गुरू, याप्रमाणें जेथें साधकच सामान्य ठिकाणीं गुरुत्व देतो, तेहि गुरुच होत. साधकाच्या निष्ठेमुळें एका अर्थी या गुरूंस जरी विशेष महत्त्व येतें, तरी आपल्याला येथें ज्या दृष्टीनें व ज्या मुद्यापुरता विचारकर्तव्य आहे, त्यांत या गुरूंचा संबंध येत नाहीं. वर जें गुरूंचें वर्गीकरण केलें त्यांत गुरूंना गुरुत्व मिळणें व त्यांचें कार्यक्षेत्र ठरणें या गोष्टी साधकांकडून सिद्ध

होत नसून त्या ईश्वराकडूनच सिद्ध असतात, असें म्हणावें लागतें. या वर्गीकरणांत व्यावहारिक गुरु आणि परमार्थ गुरु असे दोन निश्चित ठळक भेद तरी वास्तविक असलेच पाहिजेत. पण असें असून परमार्थ गुरूंच्याहि दरबारांचें स्माल कॉज कोर्ट बनावें व त्यांत प्रापंचिक अडचंणींचे दावे सुनावणीस दाखल व्हावे, याचें नवल वाटतें. जणूं काय एकाच मुख्याध्यापकानें खालपासून वरपर्यंत सारे वर्ग चालवावे असें हें दिसतें. ' येतांना तुम्ही प्रापंचिक अडचणी घेऊन या व जातांना ईश्वरोपासनेचें व्रत घेऊन जा,' अशी ही सद्गुरुपेठेंतील दुकानदारी दिसते. ज्याप्रमाणें खरा जातिवंत वाणी एका पैचें गोड, पैचें तेल, आणि पैचें तूप मिळून एका दिडकींत तीन जिनसा मागणाऱ्या ग्राहकालाहि शांतपणें अगत्यपूर्वक ते तीन जिन्नस देतो, त्याप्रमाणें सद्गुरूंच्या दर्शनाला येणारी मंडळी किती मूर्ख आणि अजाण, किती लोभट आणि लोंचट, किती पापी आणि किती पाजी असतात, तें पाहून तिऱ्हाईताचें डोकें फिरतें, पण संत शांतपणें त्यांचाहि परामर्ष घेत असतात ?

याप्रमाणें सत्समागमाला येणाऱ्या मंडळींत बहुजनसमाज केवळ दर्शनेच्छु प्रापंचिक व स्वार्थपरायणच असतो. त्यांत परमार्थलाभासाठीं म्हणून सद्गुरूंपासून उपासना घेऊन त्यांचे सांप्रदायी बनणारे थोडेच असतात. ह्या भवजलधींत एखाद्या कुशल कोळ्याप्रमाणें संत हे आपल्या कृपेचें जाळें फेंकतात त्यांत जास्तींत जास्ती मासे कसे सांपडतील तें ते पहात बसतात. त्यांना जरी त्याबद्दल कोणताच अभिनिवेश नसला तरी तें एक ईशकार्य असतें. व ईश्वर तें संतांचेकरवीं घडवून आणीत असतो. म्हणूनच ' उरलों उपकारापुरता ' असे निरहंकारी तुकाब्बांचेहि उद्गार आहेत. संतांची अशी वृत्ति असल्यामुळें व जग हें विषयलोलुप असणारच हें ते जाणत असल्यामुळें ते कोणाचा तिरस्कार करीत नाहींत.

परंतु याप्रमाणें सद्गुरूंची शान्ति अढळ असली तरी प्रवृत्ति-मार्गांतील फार मोठमोठ्या लोकोपकारक कार्यांतच सद्गुरूंचा सल्ला घ्यावा किंवा व्यक्तीच्या खाजगी व्यवहारांतहि त्यांचा सल्ला विचारावा, तसेंच एखाद्या व्यक्तीनें एखाद्या बिकट प्रसंगीं सत्य पाळावें किंवा अहिंसा पाळावी, कर्मसंन्यास करावा किंवा कर्मयोग करावा, नैष्ठिकी ब्रह्मचर्य आचरावें किंवा गृहस्थाश्रमानें वागावें, इत्यादि शास्त्राचे विकल्प उत्पन्न होऊन किंकर्तव्यमूढता येईल तितक्याच पुरतें सद्गुरूंस विचारावें किंवा त्यांच्या परवानगीवांचून व्यवहारांत एक पाऊलहि टाकावयाचें नाहीं, असें वागण्याचें धोरण ठेवावें, हा सांप्रदायिकांनीं आपल्या ठिकाणीं विचार करण्यासारखा मुद्दा आहे. कोंकणच्या देवांसारखा किंवा ग्रीकांच्या अपोलो देवासारखा प्रापंचिकांनीं आपल्या प्रापंचिक अडचणीस्तव देवाला हरघडीं कौल लावणें, कितपत प्रशस्त होईल ?

ज्याप्रमाणें लहान मुलें हें करूं कां तें करूं असें सारेंच आईला विचारतात, त्याप्रमाणें आपल्या साऱ्याच क्रिया सद्गुरूंच्या अनुमतानें चालवाव्या काय ? कित्येक सांप्रदायिकांच्या कडून या बाबतींत कधीं कधीं अतिरेक होतो व कधीं कधीं लबाडीहि होते. आईला हरघडीं विचारणारीं मुलें आई ज्याला परवानगी देण्याचा संभव नाहीं, तेवढें मात्र विचारण्याचें टाळतात. इतकेंच काय, पण अशा कामीं आईच्या मनाईकडेहि थोडें फार दुर्लक्ष करितात. तसाच प्रकार सांप्रदायिकांचा कधीं कधीं घडतो, असें दिसतें. अशा स्थितींत सच्छिष्यानें आपली कर्तव्याची जबाबदारी पूर्णपणें ओळखून केवळ अडल्यावेळीं प्रवृत्ति-मार्गांतीलहि एखादा अडचणीचा प्रश्न सद्गुरूंस अनन्यगतिक होऊन विचारला व सद्गुरूंकडून तत्संबंधीं उत्तर मिळविलें तर या क्वचित् प्रसंगोपात्त होणाऱ्या प्रश्नोत्तरांचें जें महत्त्व असेल, तें प्रत्येक

प्रश्नोत्तरांत असेलच असें वाटत नाहीं. रस्त्यावरील वजन सांगणाऱ्या काट्यांत आणेला टाकला कीं नेमकें वजन हटकून समजतें, त्याप्रमाणें एखाद्या महात्म्यापुढें पैसा, सुपारी ठेवून विचारलें कीं नेमकी भवितव्यता कळते किंवा हटकून संकट निवारण होतें, असा अनुभव दिसत नाहीं. यामुळें पूँचेटची तबकडी किंवा फलज्योतिषाची कुंडली याचप्रमाणें सद्गुरूंच्या पायांची किंमत होते ! त्यांच्या दरबारांत ज्या प्रापंचिकांची सदां गर्दी ते लोक संकटविमुक्त होतात असें थोडेंच आहे. सद्गुरूंच्या पायांवर डोकें ठेवणारा मनुष्य आपल्या प्रारब्धकर्माचा जो नारळ सद्गुरूंच्या पुढें ठेवतो, तोच ते पुन्हां त्यांच्या हवालीं करितात व आपण नामानिराळे होतात ! असाच फार करून अनुभव मिळतो आणि या आर्त सांप्रदायिकांची निष्ठाहि इतकी तकलादू असते कीं सद्गुरूंनीं दिलेला आशीर्वाद् व्यर्थ ठरला तरी ती गोष्ट ते आपल्या जीवास लावून न घेतां, लॉटरींत तिकिटें घेणाऱ्या आशिकाप्रमाणें ते पुनः पुन्हां सद्गुरूंस भवितव्यतेबद्दल ,प्रश्न विचारण्याचें कमी करीत नाहींत. आंब्याच्या झाडावर चार दगड फेंकले, त्यांतले दोन हुकले म्हणून काय झालें ? दोन दगडांनीं तर दोन आंबे पाडलेना ? मग आणखी मारून कां न पहावे ? त्यांत आपलें काय वेंचतें ? ईश्वराची इच्छा ज्यांस सहजीं कळते असे पुरुष जगांत विरळ कां होईना, आहेत ना ? मग त्यांचा लाभ ज्यांस घडेल त्यांनीं तो ऐहिक कामींहि कां घेऊं नये ? सद्गुरूंचे आशिर्वाद फळास न आले तर आपलें प्रारब्ध असें समजावें. पण क्षीण प्रारब्ध तरी सत्पुरुषांच्या आशिर्वादानें फिरणार नाहीं कशावरून ? जगांत वगवशिल्यानेंच बहुत महत्कार्यें साधतात असें आपण पाहतों. तो तरी ईश्वराच्या घरचाच न्याय ना ? मग ईश्वरास संतांच्या शब्दाची भीड कशी पडणार नाहीं ? अशी कांहीं विचारसरणी व भवितव्य समजावून घेण्याची

स्वाभाविक जिज्ञासा या प्रकारांच्या बुडाशीं असली पाहिजे असें वाटतें.

जगांत घडणाऱ्या गोष्टींत जो कालानुक्रम दिसतो तो आणखी कार्यकारणभावहि सूचित करतो, असें आपण पुष्कळ वेळां मानतों. थंड पाण्याचें आठ दिवस स्नान केलें, नंतर पडसें आलें, मागून न्यूमोनिया झाला, मग औषधि इलाज केले, नंतर बरें वाटलें. ह्या अनुक्रमांत कार्यकारणभाव आहे असें आपण मानतों. पण थंड पाण्यानें स्नान केलें तरी पडसें आलें नाहीं, पडसें झालें तरी न्यूमोनिया झाला नाहीं, न्यूमोनिया झाला तरी औषधानें बरेपणा वाटला नाहीं, असेंहि आपण पाहातों. तेव्हां आपणांस ईश्वरीनियतींत सर्व गोष्टी जशा ठरलेल्या असतील तशाच घडणार असें वाटूं लागतें. स्वप्नांतील घडणाऱ्या गोष्टींत कालानुक्रम दिसतो. पण त्यांत कार्यकारणभाव नसतो. स्वप्नांतील कोणत्याहि एका गोष्टीचें कारण त्या गोष्टीपूर्वी घडून आलेली असें दिसणारी गोष्ट नसते; म्हणजे स्वप्नांतील बाप स्वप्नांतील लेकाचें कारण नव्हे. स्वप्नांतील कुंभार स्वप्नांतील मडक्याचें कारण नव्हे. स्वप्नांतील प्रत्येक गोष्टीचें कारण एक स्वप्नच असतें. दुसरें कांहींच नसतें. तसेंच प्रपंचांतील सर्व गोष्टींचें कारण एक ईशनियति इतकेंच. स्वप्नसृष्टींतील कार्यकारणभावाचे भासाप्रमाणें गुणागुणेषु वर्तंते, प्रयत्नांतीं परमेश्वर, ईश्वरीकृपाप्रसाद, इत्यादि गोष्टींतील कार्यकारणभाव हेहि परमार्थतः भासच आहेत. तथापि रोगनिवृत्ति पूर्वी औषधसेवन असा ईश्वरी नियतींत जसा प्रकार दिसतो, व त्यामुळें वैद्य व वैद्यशास्त्र निर्माण होतें, त्याप्रमाणें आधिव्याधिनिरसनापूर्वी संतकृपा, असाहि कालानुक्रम कधीं कधीं घडतो, त्यामुळें संतसेवा, उपासना, भजन, व्रतपालन, अंगारे धुपारे, तोडगे इत्यादि प्रकारहि रूढ होतात. व त्यांचे निरनिराळे संप्रदाय व शास्त्रें

बनतात. घड्याळाच्या तबकडीवर तासाचा कांटा दहावर गेला कीं, मेजके दहा वाजावे, व सहावर गेला कीं सहाच बाजावे, किंवा मोठा कांटा सहावर गेला कीं, अर्धेतासाचा एकच ठोका पडावा अथवा मेजक्या ठराविक वेळीं गजर व्हावा, या अनुक्रमांत व बाह्यांतर स्थितींत जो योग व चमत्कार आहे तो घड्याळ दुरुस्त लावलें आहे व त्याची चावी सरली नाहीं तोंपर्यंत अचुक घडतो. त्याप्रमाणें संतांच्या कृपेच्या व आशिर्वादाच्या हातांकडे पाहून, संसारचक्रांत भरडल्या जाणाऱ्या जीवांच्या सर्व विघ्नांना परत जाण्याची सुटी म्हणून गजर व्हावा व सर्व विघ्नें गिरणींतल्या कामगारांप्रमाणें भराभर चालतीं व्हावीं, पण तसें घडतेंच असें नाहीं. याचें कारण आमचें घड्याळ चहा पितें. दुर्वासनांनीं गंजलेलें घड्याळ नीट काम देत नाहीं. घड्याळा-बाहेरील हात दाखवितात एक आणि आमचे वाजतात बारा! विद्युत्-संचयाच्या वलयांतून विद्युत्प्रवाह आकर्षित करण्यास योग्य जातीची व संस्काराची तार लागते. व्यसनी (दुःखी) माणसांची तार कशी लागेल त्याचा काय नियम! त्यांच्या तारेंत क्वचित् उलट धक्काहि बसायचा!

तात्पर्य, औषध घेतल्यावर निरोगी व्हावें, तसें संतसमागम झाल्यावर सर्व आबादानी असावी, असें आपण समजतों, व त्याप्रमाणें कधीं कधीं घडते, असेंहि,आपण अनुभवितों. परंतु या कालानुक्रमांत औषधें घेऊनहि रोगी मरतात किंवा जायबंदी होतात. त्याप्रमाणें संतांचे कृपेनें व आशिर्वादानें झालेल्या लग्नानंतरहि वधूला वैधव्य प्राप्त होतें, वर विधुर बनतो, संतांचा अंगारा मिळूनहि रोगी मरतात, भक्तांच्या चिंता व दारिद्य दूर होत नाहीं इत्यादि अनिष्ट प्रकार घडून येतातच. जिच्या पोटीं प्रभु रामचंद्र जन्मास आले त्या कौसल्येचें वैधव्य रामालाहि टाळतां आलें नाहीं! त्याच्या प्रियपत्नीचा वनवास त्यास दूर करतां आला नाहीं! श्रीकृष्णाचे आईबाप अत्यंत खडतर कैद भोगीत होते!

यादवांचा क्षय त्यानें डोळ्यांनीं पाहिला ! अभिमन्यूसारखा लाडका सुभद्रासुत त्यास वाचवितां आला नाहीं ! श्रीकृष्णाच्या स्त्रियांचीहि त्यांच्या पश्चात् दैना झाली ! ज्ञानदेव तुकोबादि संतांचीं चरित्रें हीच कर्मकथा सांगतात ! श्रीसद्गुरु काका पुराणिक यांनीं, व त्यांचे गुरु व परमगुरु यांनीं त्यांच्या प्रियपत्नींचें सौभाग्य राखण्याची आस्था बाळगली नाहीं. रावसाहेब कोल्हटकरांस आपलें थोडेसें ब्रह्मस्व फेडतां आलें नाहीं. बाळपणीं त्यांच्या अंगावर खेळलेली त्यांची आवडती मानलेली कन्या ती. गं. आऊताई यांनीं साऱ्या जन्मभर अत्यंत दुःख भोगलें ! त्यांचीं सारीं मुलें मोठीं होऊन त्यांच्या डोळ्यांदेखत मेलीं ! त्यांना वैधव्य आलें ! वेड लागलें ! खाण्याचीहि पंचाईत पडली ! व अखेर मरण येईपर्यंत भयंकर शरीरपीडा सोसाव्या लागल्या ! श्री. काकांच्या साऱ्या मुलींची दैनाच झाली ! काकांनीं स्वतां झाडापानांचा पाला खाऊन व फणसांवर राहून, सावकारांचीं दुरुत्तरें ऐकत कित्येक खडतर दिवस काढले ? या ठळक गोष्टींवरून सूज्ञ सांप्रदायिकांनीं पुष्कळच बोध घेण्यासारखा आहे. परंतु मनुष्याची आशा व मोह फार कठीण आहे ! आपण जपावें व दुसऱ्याला यश द्यावें, या व्यावहारिक म्हणींत फार खोल अर्थ भरला आहे. त्याचा सर्वांनीं विचार करावा. ज्या सद्गुरु भजनानें परिसाप्रमाणें सारें सोनें होतें तें भजन म्हणजे अंतराची निःसंगता होय. एका निःसंगतेनें सारें ईश्वरमय होतें.

श्री. काकांचें एक फार मोठें कविताबद्ध चरित्र त्यांचे कट्टे भक्त कै. विष्णुशास्त्री नेने यांनीं रचलेलें प्रसिद्ध झालें आहे. त्यांत श्री. काकांच्या अंगाऱ्यानें व आशिर्वादानें अनेकांचें संकटनिवारण झाल्याच्या शतावधि कथा आहेत. तसेंच त्यांनीं कोणाच्या स्वप्नांत जाऊन दृष्टांत दिला, त्यांनीं दर्शनास येणाऱ्या पृच्छकाच्या मनांतील आशंका जाणून आपण होऊन न विचारतांच त्याला निःशंक करण्यासारखें सहज

उत्तर दिलें, त्यांनीं भक्तांवरील संकट दूर करण्यासाठीं त्यांचें दुखणें आपण आपल्यावर ओढवून घेतलें, त्यांनीं सांगितलेलीं भविष्यें खरीं ठरलीं, मनास पटण्यासारखे व चटका लावण्यासारखे नेमके सूचक शब्द उच्चारले, अशा अनेक गोष्टी त्यांत वर्णिल्या आहेत. पण वर आरंभीं दिलेल्या श्रीसमर्थ रामदास यांच्या उक्तीप्रमाणें श्रीसमर्थ काकामहाराज स्वतां या गोष्टींस फारसें महत्त्व देत नव्हते, असें दिसून येतें. दृष्टांत, साक्षात्कार, अंगाऱ्याचे गुण इत्यादि प्रकार ईश्वर कधीं कधीं घडवितो, असें मोघम ते म्हणत. कोणी त्यांस आनंदानें सांगितलें कीं 'आपण मला स्वप्नांत येऊन असा दृष्टांत दिलात, तो खरा ठरला!' तर ते प्रांजलपणें असेंच सांगत कीं तुम्ही काय म्हणतां तें मला कांहीं माहीत नाहीं. पण तो महालाघवी ईश्वर कोणाला काय चमत्कार दाखवील व कोणाला 'काय भूल घालील, त्याचा नियम नाहीं! संकटनिरसनार्थ हजारों आर्तजीव त्यांचेकडे गेले असतील, सर्वांना ते अंगारा देत व तन्निमित्तानें थोड्या फार रीतीनें ईश्वराच्या उपासनेला लावीत. पण 'ईश्वर काय करील तें खरें' हेंच त्यांचें ब्रीदवाक्य होतें. त्यांस एकदां एका वृद्धानें विचारलें कीं, "आपणासारिखे करिती तात्काळ। नाहीं काळ वेळ तयालागीं" असें संत म्हणतात. मग आम्हांला तुम्ही आपल्यासारखे अद्याप कां करीत नाहीं?" त्यावर त्यांनीं त्यांच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें उत्तर दिलें कीं "तुम्ही म्हणतां ते सदगुरु वेगळे. तो मी नाहीं." दुसऱ्या एका प्रसंगीं अशा प्रकारचा प्रश्न विचारणाऱ्या दुसऱ्या एका तरुणास ते म्हणाले कीं "अहो तें काम काय सोपें आहे? त्यास रक्ताचें पाणी करावें लागतें! तुम्ही लंगोटी नेसून मी सांगतों तेथें बसतां काय? मग तुम्हांला ब्रह्म दिसेल!" या दोन्हीं उत्तरांत जो भेद आहे तो पृच्छकाच्या भावाप्रमाणें जशास तसा आहे. दोन्ही उत्तरें औपचारिक

नसून खरींच आहेत. तसाच एखादा सच्छिष्य असला तर वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें क्वचित् त्याला ते आपल्या खऱ्या ऐश्वर्याचीहि चुणूक दाखवीत. पण असें फारच क्वचित एकान्तांत घडे. जास्त मंडळींत त्यांचें अमानित्वच कायम असे. तुकोबांच्या उक्तीप्रमाणें काकाच सद्गुरु खरे. पण ते कोणाला? ज्याची तशी निष्ठा व तयारी असेल त्याला. इतरांना ते सामान्य सत्पुरुषाप्रमाणेंच होते. सद्गुरु आणि सच्छिष्य ही सापेक्ष जोडी आहे. ईश्वराला अहंकार मुळींच खपत नाहीं हें काकांचें एक ब्रीदवाक्य होतें. त्यांच्या भाषणांत मी हा शब्दच कधीं येत नसे. सर्व कर्ता-करविता ईश्वर. भगवान् काय करील तें खरें. अशीच त्यांची नेहमीं भाषा असे. एकदां भागवतांतील एकादशस्कंदापैकीं दुसऱ्या अध्यायांतील 'कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा' ह्या सुप्रसिद्ध श्लोकाचे दुसऱ्या चरणांत "करोति यद्यत्सकलं" किंवा 'करोमि यद्यत्सकलं' असे दोन पाठ आढळले, तेव्हां यांपला योग्य कोणता असें काकांस विचारतां, ते म्हणाले दोन्ही पाठ असले तरी 'करोति' हाच पाठ बरा. 'करोमि' यांत नसता अहंकार आपलेकडे येतो. श्रीकाका आपली पूजा करून घेत नसत. ती पूजा सर्वाधिष्ठाता याची म्हणून करून घेत. त्यांनीं आपलेकडे मोठेपणा कधींच लावून घेतला नाहीं. त्यांच्या बोलण्यांत सर्व हवाला ईश्वरावर असे. श्री. रामकृष्ण परमहंसाप्रमाणें ते कट्टे सगुणोपासक होते. श्री. रामकृष्णांच्या वृत्तींत व श्री. काकांच्या वृत्तींत पुष्कळच साम्य असे. आधुनिक काळांतील सत्पुरुषांत काकांना रामकृष्ण परमहंसांचीच उपमा शोभेल.

श्री. काकांचें चरित्र मीं लिहावें असें कै. तात्यासाहेब व इतर गुरुबंधु यांचे फार मनांत होतें. त्यासाठीं तात्यांनीं मजकडून प्रश्न-पत्रिका तयार करवून घेऊन व त्या छापून सांप्रदायिकांत वांटल्याहि

होत्या. पण विशेष माहिती मिळाली नाहीं व मला या प्रयत्नापासून माझ्या एका ज्येष्ठ गुरुबंधूंनीं पुढें परावृत्त केलें. त्यांचें म्हणणें असें कीं, "काकांचें बाह्य वर्तन हें त्यांचें खरें चरित्र नव्हे. त्यांचें खरें चरित्र अत्यंत गूढ होतें. तें कोणास समजण्यासारखें नाहीं. बाह्य चमत्कारांच्या गोष्टींचें महत्त्व ज्या सांप्रदायिकांस वाटत असेल, त्यांनीं त्या गोष्टी एकमेकांपासून ऐकाव्या. पण त्या छापून प्रसिद्ध करणें योग्य होणार नाहीं. यास्तव उगाच कांहींतरी पांढऱ्यावर काळें करण्याचा व्यर्थ उपद्व्याप मी करूं नये."

हें त्यांचें म्हणणें मलाहि पटलें व मीं तो नाद त्यावेळीं सोडून दिला. अद्यापहि मला असेंच वाटतें कीं त्यांचें खरें चरित्र अगम्य आहे. तें संतप्रेमी व आत्मानुभवी कवींच्या सद्ग्रंथांच्या आधारें जितकें जाणतां येईल तितकें जाणावें म्हणून पुढील सदाचार व सद्विचार ह्या प्रकरणांत मीं तसा अल्प प्रयत्न केला आहे. त्यावरून वाचकांनीं अनुमान करावें. श्रीसद्गुरूंचें यथातथ्य चरित्र लिहिण्यास मी पूर्वीं असमर्थ होतों व आजहि असमर्थच आहें. काका दिसण्यांत एक कट्टे सगुणोपासक होते. ते परमार्थतः सद्गुरुच होत. पण त्यांचें तें ब्रह्मरूप सद्गुरुपद आम्हांस कळण्यास आमची तपश्चर्या पुष्कळच घडावयास पाहिजे. जिला ऋतु प्राप्त झाला नाहीं, ती बाला विवाहित असली तरी तिला पतिसुखांतील आनंद काय कळे! त्याप्रमाणें सांप्रदायिकांनाहि योग्य समय प्राप्त होईपर्यंत सद्गुरु तत्त्वमस्यादि वाक्योपदेशानें ब्रह्मानंदाची जोड कशी करून देतात तें कळणें शक्य नाहीं.

तात्यांची व त्यांना सद्गुरूपासनेंत गुंतविणाऱ्या दत्तोपंत सांडूंची उपासनेची दृष्टि भिन्न होती. दोघेहि व्यावहारिक आणि दोघेहि कामानिक वृत्तींचेच दिसतात. पण त्यांतल्यात्यांत उपासनेची फलश्रुति केवळ चित्तशुद्धींत आहे, अशी दत्तोपंतांची भावना दिसते. तात्या

भावनाप्रधानच होते. पण त्यांच्या भावनांना व्यावहारिक एषणांचें स्वरूप प्राप्त झालेलें होतें. सांप्रदायिक भजन मंडळींत बसून तासचे तास भजन करावें, अथवा भिक्षुक मंडळींत तासचे तास बसून रुद्रावर्तन करावें, याची त्यांस आवड नसे. ते कांहीं दिवस रात्रीं साडेतीन चार वाजतां उठून अश्वत्थ वृक्षास पुष्कळ प्रदक्षिणा घालीत, त्यांच्या पहिल्या कुटुंबास एक लक्ष प्रदक्षिणा घालण्याच्या होत्या त्या तें कुटुंब वारल्यामुळें तात्यांनींच पुऱ्या केल्या. तसेंच तात्या कधीं कधीं नमस्कारहि घालीत, सात दिवसांत अध्यात्मरामायणाची आवृत्ति संपवीत, असें कडक व्रताचरण करीत; परंतु हीं सारीं व्रतें संकटनिरसनार्थ निरुपायानें ते करीत असत.

तारीख ४ नवंबर सन १९०० च्या दत्तोपंतांस लिहिलेल्या एका विस्तृत पत्रांत ते लिहितात—

" भक्ति करावयाची ती अव्यभिचारी असावी. आत्मोन्नति जेणेंकरून होईल, तो विचार श्रेयस्कर; असें कालच्या कार्डांत आहे. श्री. कृष्णांनीं अर्जुनाला युद्ध करणें श्रेयस्कर म्हणून सांगितलें. त्याच न्यायानें निरंतर श्रींच्या कारखान्याचे बेत मनांत आणणें व त्यांच्या कृपा असलेल्या मनुष्यांच्या हातून ते सिद्धीस नेण्याची खटपट करणें हें मी आत्मोन्नति करणारें समजत आहें. तर याबद्दल आपण खुलासा कराल, तर बरें होईल. स्नान संध्या, भोजन, सुखोपभोग हेहि या कामांतच मी समजावे कीं नाहीं, याबद्दल कृपा करून श्री सद्गुरूंचा अभिप्राय कळवाल अशी आशा आहे. "

त्यानंतर २९ नवंबर सन १९०० रोजीं दत्तोपंतांनाच लिहिलेल्या पत्रांत तात्या लिहितात—

" श्रीसद्गुरुआज्ञापालन, विद्यमान श्रीगुरुलीलाश्रवण करणें आणि परमार्थकित्ता वळविणें या गोष्टींचें विवरण कळलें. याहून

अधिक विवरण सविस्तर रीतीनें वेळोवेळीं मिळत असावें व त्यायोगें मनावर त्याचा परिणाम होईल. अशा गोष्टीविषयीं शंका व समाधान या दोहोंबद्दलहि अद्याप अधिकार मिळालेला नाहीं; सबब मजकडून याबद्दल फारच थोडे वेळीं कांहींतरी लिहून जात जाईल. "

तात्या रजोगुणी होते. त्यामुळें ते सद्गुरूंचा उपयोग परमार्थापेक्षां व्यवहाराकडेच करून घेत. केवळ स्वत:च्या कुटुंबाबद्दलच, किंवा आपल्या कारखान्याबद्दल नव्हे, तर तात्यांचे आप्त, इष्ट, मित्र, ग्रामस्थ, ग्राहक, नोकर, सर्वांच्या आधिव्याधीसंबंधीं तक्रारी ते सद्गुरूंस कळवीत व याचा बंदोबस्त करावा, अशी त्यांस विनंति करीत. तात्यांचा अशा प्रकारचा श्रीसद्गुरु काकांशीं होणारा पत्रव्यवहार पुढें इतका बेसुमार वाढत गेला कीं, तो पाहून त्यास उत्तरें पाठविण्यास काकांसहि फार कंटाळा येऊं लागला. पण या गोष्टीची तात्यांना अखेरपर्यंत कल्पना नव्हती. कारण अति त्रोटक कां होईना पण प्रत्येक प्रश्नाचें सरळ उत्तर तात्यांस श्रींकडून मिळत होतें. उत्तराबरोबर बहुधा अंगाराहि असे. असा हा व्यवहार बिनबोभाट चालत असल्यामुळें सद्गुरु म्हणजे प्रापंचिक विघ्नविनाशक ईश्वरी विभूति आणि सद्गुरुसेवा म्हणजे श्रींचा कारखाना जोरांत चालविणें, अशी त्यांची स्थूल मानानें भावना होती. दत्तोपंतहि सद्गुरूंचा उपयोग व्यावहारिक सल्लामसलतींत करून घेत नव्हते असें नाहीं, पण त्याबरोबर आत्मोन्नतीकरितां सद्गुरुभजनानदांत ते रंगत असत. हा मतभेदाचा प्रश्न धसास लावावा म्हणून तात्यांनीं श्रीसद्गुरूंस एकदां खुला प्रश्न विचारला कीं "संध्यावंदनादि नित्योपासना मी करीत असतों. परंतु मनांत असें येतें कीं हाहि वेळ मी रोग्यांची औषधयोजना करणें इत्यादि कारखान्यांतील उपयुक्त लोकोपकारक

कामांतच घालविला तर तीहि श्रींचीच उपासना होणार नाहीं काय?" त्यावर श्रीसद्गुरूंनीं असें उत्तर दिलें कीं, "तुम्ही म्हणतां तें कार्य उत्तमच आहे. परंतु संध्यावंदनादि नित्यकर्म आणि अध्यात्मरामायणाचा पाठ यांचें महत्त्व स्वतंत्र आहे व तें फार अधिक आहे." हें काकांचें उत्तर तात्यांस कितपत पटलें असेल तें सांगवत नाहीं. परंतु तें कांहीं असलें तरी प्रपंचाचे व कारखान्याचे नियंते व चालक श्रीशिवगुरु आहेत, ही त्यांची अंतरींची दृढ भावना, त्यांच्या बाह्य प्रपंचासक्तींतहि त्यांस तारक झाली. आणि याच भावनेनें पुढील संकटकाळांत त्यांना वेळोवेळीं धीर दिला, यांत शंका नाहीं. तो कथाभाग पुढील प्रकरणांत निवेदन होईल.

सारांश, जेणेंकरून थोडा थोडा कां होईना पुण्यसंचय होईल, सत्त्व वाढेल अशा प्रयत्नांत असलें म्हणजे यथावकाश अंतिम साध्यहि साधतें. वासुदेवाचा पेला थेंबाथेंबानेंच भरतो व अखेर एकाच थेंबानें निःशेषहि होतो. तसेंच दुसरा असा विचार मनांत येतो कीं, श्रीएकनाथांचें व गिरजाबाईचें लग्न झालें, तेव्हां गिरजाबाईना आरंभीं इतर बालवधूंप्रमाणें पति हा एक कुतूहलाचा विषय झाला असेल इतकेंच. पण पुढें त्या जसजशा मोठ्या होत गेल्या, तसतसा पति हा वस्त्राभरणें व अप्रतिम विषयानंद देणारा इतकेंच काय तर परम श्रेष्ठ ब्रह्मानंदाचाहि दाता आहे, हा अनुभव त्यांना घडला! त्याप्रमाणें संत आणि सामान्य सांप्रदायिक यांच्यामधील सत्संग उत्तरोत्तर विकास पावत जात असावा असें दिसतें. आपल्याला काळोखांत आपल्या दूरवरच्या घरीं जावयाचें असेल, तर तें आपलें अति दूरस्थ गृह एकदम प्रकाशित करील असा दीप लाभणें कठीण. आणि तसा तो असलाच पाहिजे असेंहि नाहीं. आपल्या वाटेंतील पुढील दहा पावलांचा मार्ग जो दिवा दाखवील, तोच आपल्याला दूरच्या घरापर्यंत पोंचविण्या-

सहि उपयोगी पडेल. या न्यायानें सामान्य प्रापंचिकाची गुरुनिष्ठा 'यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम' असें ब्रह्मधाम प्रकाशित करण्यास आरंभींच जरी समर्थ नसली, तरी क्रमाक्रमानें मनोमार्गांतील मोहांधकार दूर होत जाऊन तोच निष्ठेचा दीप आपल्याला आपलें सुखनिधान दाखवील असा भरंवसा गुरूपदिष्टांनीं ठेवावा. व गुरुवादासंबंधीं निंदा करणारांनींहि हें रहस्य लक्षांत घ्यावें. गुरुनिष्ठेचा दीप हातीं असल्यावर आमच्यापुढें पसरलेल्या संकटांच्या निबिड अंधकाराला काय भ्यावयाचें आहे !

**सद्गुरुसारिखा । असतां पाठिराखा ।**
**इतरांचा लेखा । कोण करी ! ॥ १ ॥**





तात्यांची घरची व कारखान्यांतील मंडळी. ( सन १९०२. )

[ पृ. २५३



# प्रकरण २० वें.

## संकटकाल
## व
## संकटकालांतील आधार

विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः ।
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ १ ॥ भर्तृहरि.

[ जे उत्तम पुरुष आहेत, ते कार्यांत शतशः विघ्नें आलीं, तरी हातीं घेतलेलें काम अर्धवट कधींहि टाकीत नाहींत. ]

तारीख २५ आक्टोबर सन १८९८ चे पत्रांत तात्या लिहितात– "प्रपंचांत व्यापारांत व शरीरसंपत्तींत अडथळे हे–मनुष्य कशाहि स्थितींत असो–यावयाचेच. त्यांतून निभावून जाणें, मार्ग सुचणें, मदत मिळणें, हें ज्याला अधिक, तो अधिक सुखी. बाकी, पैशाचें काम एखादे समयीं असेल. इतर कामांत पैशाचें महत्त्व फारसें असतेंच असें नाहीं." हे तात्यांचे उद्गार त्यानंतरच्या वर्षांत चांगलेच कसोटीला लागले.

दुष्काळ आणि पटकी हीं संकटें पनवेलीनें पूर्वीपासून अनुभवलेलीं होतीं, पण प्लेग हें महाभयंकर संकट ह्याच देशावर नवेंच होतें

आणि आरंभीं आरंभीं तर पनवेलीवर बहुतेक दरसाल प्लेगची धाड येत होती. प्लेगवर औषधयोजना काय करावी, तें तात्यांनीं अनुभवपूर्वक ठरवून, सन १९०० चे आरंभींच तत्संबंधीं खुलासेवार माहितीपत्रकें छापून प्रसिद्ध केलीं. तीं फुकट वांटलीं व प्लेगचे रोग्यास देण्यासाठीं औषधेंहि पुष्कळच फुकट वांटलीं. या कामीं औषधांचा सर्वत्र प्रचार करण्यासाठीं दत्तोपंत सांडू यांनीं बरीच खटपट केली. आणि यश व पुण्य संपादन केलें. हा प्लेगचा ताप कारखान्याला विशेष भोंवला नाहीं. कारखान्याच्या नोकरांमधील कांहीं माणसें प्लेगनें लागलेलींहि बरीं झालीं. त्यास ज्याची त्याची प्रारब्धरेषा हें तर कारण आहेच आहे. पण त्याशिवाय, श्रीसद्गुरु काका महाराज यांच्या आज्ञेवरून शके १८२२ चे वैशाखापासून म्हणजे सन १९०० चे मे महिन्यापासून श्रीधूतपापेश्वर संस्थेचा लघुरुद्र दर सोमवारीं प्रथम कांहीं दिवस प्रदोषसमयीं व मग सकाळीं तात्यांचे घरीं नियमानें होऊं लागला. हा लघुरुद्र करणाऱ्या ब्राह्मणांनीं रुद्र म्हणतांना घाई न करितां फार सावकाश म्हणावा, आणि रुद्राभिषेक झाल्यानंतर तें तीर्थ तात्यांनीं आपल्या घरच्या मंडळीस व नोकर लोकांस द्यावें, असें श्रीसद्गुरूंचें वरचेवर सांगणें असे. व त्याची अंमलबजावणीहि होत असे. अर्थात् ह्या दैवी उपायाचाहि संकटनिवारणार्थ उपयोग झालाच असला पाहिजे. पण या दैवी उपायांच्या फलितालाहि प्रारब्ध रेषांची मर्यादा असतेच. यामुळेंच तात्यांचे विद्यागुरु सखारामशास्त्री प्लेगास बळी पडले ! तात्याहि प्लेगचे दिवसांत एकदां कारखान्यांत उंदरांची घाण येत असून तेथें बसले असतां त्यांचें एकाएकीं डोकें दुखूं लागून ताप भरून अजारी झाले. पण तो ताप प्लेगाचा नसावा. तात्यांचे पत्नीस मात्र प्लेग झाला होता. त्यांतून देवाच्या दयेनें त्या निभावल्या ती हकीकत पुढें येईलच.

या प्लेगच्या धाडीनें तात्यांना जितकें अस्वस्थ केलें होतें, त्याहीपेक्षां एजन्सीच्या वादानें त्यांना अतीच ताप झाला. त्यांतहि अडसंधींत दुखणें आणि जांवई वैद्य, असा कांहीं प्रकार झाला. श्रीसद्गुरु या वादांचा निकाल लावतील, असा तात्यांस सहजींच भरंवसा होता. पण या व्यवहारांत श्री. काकांनीं तात्यांना केव्हांच बाजू दिली नाहीं. तात्यांनीं प्रथम सन १९०० सालीं सांडूंनीं काय नियमांनीं एजन्सी चालवावी, ते नियम करून ते श्रींच्या मंजुरीकरितां धोपेश्वरीं पाठविले. पण "दत्तोपंतांशीं धंदा दोन वर्षें पूर्ववत् चालूं द्यावा. एजन्सीचे नियमांचे तूर्त भानगडींत पडूं नये, त्याला अद्याप अवकाश आहे." असाच जबाब श्रीकडून त्यांस मिळाला. पुढें सन १९०१ सालीं "पूर्ववत् सर्व व्यवहार ठेवण्यास मी आतां असमर्थ आहें असें दत्तोपंत सांडूच कळवितात. कारखान्यांतून चूर्णें न मागवितां आपणच आपलीं विकतात." वगैरे तक्रारी तात्यांनीं श्रींकडे कळविल्या तर त्याचेंहि उत्तर "एव्हांशीं या बाबतींत कांहीं सांगतां येत नाहीं" असें मिळालें. "सांडूंकडे कारखान्याचीं पांच हजारांचीं औषधें आहेत. तीं परत मागवावीं काय?" म्हणून तात्यांनीं पुन्हा श्रीगुरूंस प्रश्न विचारला. तर त्यावरहि, 'तूर्त असूं द्यावीं; त्यासंबंधीं पुढें कळेल,' असा जबाब मिळाला.

या एजन्सीच्या भानगडीनें तात्यांच्या मनाला एकसारखा त्रास होत राहिला असें दिसतें. त्यासंबंधीं स्पष्ट उल्लेख सन १९०१ च्या श्रींस पाठविलेल्या एका पत्रांत करून पुढें ते लिहितात—"मनाला हुरहुर लागण्यासारख्या गोष्टी कांहीं तरी उपस्थित होतात व रात्रंदिवस त्यांत मन विचार करीत असतें. रात्रीं झोंपहि येत नाहीं. असें वाटतें कीं, दूर देशांतरीं जावें. झोंपेकरितां अफु अगर भांग घेत जावी. परंतु आजपर्यंतचा संस्कार तसा नसल्यामुळें थोडच्यासाठीं शंका वाटते.

तात्पर्य, एकामागून एक अनेक कल्पना निघून त्या लयास जातात."

हें एजन्सींचें दुखणें लवकर थांबलें नाहीं. अखेर सन १९०३ चे पावसाळ्यांत दत्तोपंत सांडू एकाएकीं प्लेगनें वारले! तात्या तेराव्याला गेले होते. सांडूंच्या कुटुंबावर तर तो वज्राघातच होता! तो त्यांच्याहि मनावर या सन्मित्राच्या आकस्मिक निधनाचा बराच परिणाम झाला असावा. दत्तोपंतांच्या निधनानंतर सांडू–पुराणिक प्रकरण आपसांत मिटणें अशक्यच झालें. दोन महिन्यांनीं सांडूंकडील औषधें पुराणिकांनीं परत आणलीं. दरम्यान सांडूंच्या आर्यौषधि कारखान्याच्या रोपानें मुळें धरलीं व दोन वर्षांचे आंतच खुद्द पनवेल व राजापूर येथें सांडूंचीं औषधी दुकानें सुरू होण्याचा घांट दिसूं लागला. ही गोष्ट अर्थात् तात्यांना रुचण्यासारखी तव्हती. पुढें कर्मधर्मसंयोगानें तीं दुकानें चालूं राहिलीं नाहींत. यामुळें चुरशीनें हें एजन्सीप्रकरण जास्त विकोपास जावयाचें तें गेलें नाहीं. पुढें काळाच्या विस्मृतीच्या प्रवाहांत हा वादाचा विषय निघून गेला.

एका बाजूस सांडू व दुसऱ्या बाजूस पुराणिक यांच्यामधील हा एजन्सीचा लढा ताबडतोब न मिटवितां तसाच दोन तीन वर्षें दाबून ठेवण्यांत श्रीगुरूंचा काय हेतु असावा हें निश्चयात्मक सांगतां येणें शक्य नाहीं. तथापि असें अनुमान होतें कीं, त्यांना दत्तोपंत सांडूंचें आयुष्य संपत आलें, हें स्पष्ट दिसत असावें. ह्याच कारणास्तव ज्या दत्तोपंतांनीं तात्यांना पूर्वीं बरीच मदत केली होती, त्यांचें मन थोड्यासाठीं दुखविलें जाऊं नये, असेंच श्रीगुरूंचे मनांत असावें. दत्तोपंत सांडूंचा काकांशीं संबंध तात्यांपेक्षां जास्त जिव्हाळ्याचा होता. यामुळें दोन वर्षें पूर्ववत् चालूं द्या एव्हांच मी उत्तर देत नाहीं, औषधें केव्हां परत न्यावीं तें आणखी थोड्या दिवसांनीं कळेल, अशी तात्यांच्या तक्रारींना श्रींकडून सन १९०० ते १९०३

पर्यंत एकसारखीं मोघमच उत्तरें येत गेलीं. ह्या त्यांच्या मुग्ध-पणामुळें तात्यांचे मनाचा फारच कोंडमारा झाला असेल हें उघड दिसतें; तसेंच या क्रान्तीच्या दोनतीन वर्षांत सांडूंना आपल्या धंद्याचा बस बसविण्यास पुराणिकांच्या एजन्सीचा उपयोग झाला असेल. पण सांडू व पुराणिक या दोघांचेहि कारखाने नीट चालावे असेंच काकांचे मनांत असल्यामुळें ते तात्यांना थोडे दिवस धीर धरा, उतावळी करूं नका, असें सांगत असावेत. एरव्हीं हा एज-न्सीचा ग्रंथ नीट लागत नाहीं.

सन १८९९नंतर तात्यांना कांहीं काल अनिष्ट आहे हें ते ज्योतिषाचे आधारें जाणूनच असावेत असें दिसतें. भृगुसंहितेंत तसा स्पष्टच उल्लेख आहे. तारीख ९ जानेवारी सन १९०० चे पत्रांत तात्या लिहितात "गेले सहा महिने व येणारे सहा महिने प्रत्येकाचें मन प्रत्येक व्यक्ती-संबंधानें साशंक असेल, असें एक आर्यभूसंबंधानें तरी आपण अगदीं आंतील मनांत बाळगून ठेवावें व व्यवहार चालवावे. सिंहानें शेवाळ खावी अगर उपास करावा!... मित्र गुर्जर यांचे पत्रामुळें अत्यंत दुःख झालें, असेंच नव्हे, तर इतर सर्व परिस्थिति हल्लीं पहावी तों उलट होत आहे! असें स्पष्ट सांगतां येतें. हा सर्व प्रकार सहा महिन्यांनीं कारखान्यासंबंधानें व दीड वर्षानें आर्यभूसंबंधानें उज्ज्वल होईल, असें अनुमान आहे." या व अशा अनेक उल्लेखांवरून असें दिसतें कीं, तात्यांचें मन म्हणजे भावीकालाची एक वेधशाळाच होती. ते भूतकालाचा फारसा विचार करीत नसत. इतकेंच नव्हे तर वर्तमानकालांतहि फारसें गुंतून न राहतां ते भविष्यकालांतच फार करून मनानें राहात असत. श्री. कृष्णमूर्ति यांच्या व्याख्यानांत हा एक मुद्दा अवश्य असतो तो हा कीं, वरचेवर मागें पाहूं नका. उद्यांचा काल तुमच्या आजच्या वर्तनावर अवलंबून आहे. यास्तव मागें न

पाहतां पुढें पाहून पाऊल टाका, तरच तुम्हाला शाश्वत सुखाचा ठेवा सांपडेल. '

तात्यांची नजर नेहमीं पुढें असे. ते जबरदस्त आशावादी होते. पुढें संकट दिसत असलें तरी त्यांतून आपण पार पडूंच, असा त्यांना विश्वास असे. त्यांना ज्योतिषाचा नाद नसता तर पुढें संकटकाल येणार आहे, असें त्यांचे कधीं स्वप्नांतहि आलें नसतें.

तात्यांच्या वरील भविष्यानंतर थोडेच दिवसांनीं त्यांच्या ध्यानीं मनीं नसलेली गोष्ट घडून आली. तात्यांचें कुटुंब प्रसूत होऊन नवव्या दिवशीं तारीख २१ फेब्रुवारी सन १९०० रोजीं बाळंतपणाचे विकारानें मरण पावलें ! त्यापूर्वीं भाविसंकटानिरसनार्थ श्रीसद्गुरूंनीं त्यांना पत्रद्वारां कांहीं उपासना सांगितली होती, असें दिसतें. पण त्या अपायांवर उपायाला आरंभ होण्यापूर्वींच त्यांच्या संकटपरंपरेंतील एक जबरदस्त आघात होऊन गेला ! तारीख २६ मार्च १९०० चे पत्रांत ते लिहितात, "आपली आज्ञा पूर्वपत्रीं सोयेर आटपल्यावर प्रदक्षिणांना आरंभ करावा. ती ज्यावेळीं पोंचली, त्याच वेळीं सौभाग्यवती अत्यंत संकटांत होती. आलेला अंगारा तोंडांत दिला व छातीला, पोटाला व मस्तकाला लावण्यास सांगितलें. दोन घटकांनीं तिनें या मृत्युलोकाला सोडलें ! अखेर आपल्या आशिर्वादामृतानें कांहीं हेतु न राहतां तिला उत्तम गति मिळाली असावी यांत शंका नाहीं. मागें एक मुलगी नऊ वर्षांची आहे. पुत्रसंतति नाहीं. आणि ऐन मध्यवयांत वियोग झाल्यामुळें ' ना प्रपंच ना परमार्थ ' अशी स्थिति झाल्यामुळें मनाला फार खिन्नता आली आहे ! तथापि श्रीसद्गुरुकृपें उद्योगाकडे दुर्लक्ष झालेलें नाहीं, ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट आहे." तात्यांनीं हें पत्र पत्नीचे निधनानंतर महिन्या सवामहिन्यानें लिहिलें आहे. आरंभीं स्त्रीनिधनाचा तात्यांचे मनावर फारच मोठा

धक्का बसला. त्यामुळें कांहीं दिवस त्यांना कामकाज कांहीं सुचेना. ते अगदीं भ्रमिष्टासारखे झाले! एकच स्त्री पुरुषाला निरनिराळ्या तऱ्हेनें उपयोगी पडते, ते सारेच संबंध जिव्हाळ्याचे असतात. त्याची भरपाई दुसरे कशानें होण्यासारखी नसते. शिवाय गेलीं सतरा वर्षें जिनें आपली एकनिष्ठभावानें अनेक प्रकारें सेवा केली, पडत्या काळांत अतिशय कष्ट सहन केले, तिनें पुत्राचें मुख पाहिलें नाहीं, आणि भावि सुखाचे दिवस पाहण्यासहि ती जगली नाहीं, हे विचार तात्यांच्या कोमल अंतःकरणास दुःसह होण्यासारखेच होते. स्त्रीची आणि आईची खरी किंमत त्यांच्या मरणानंतर, त्या अलौकिक निरपेक्ष प्रेमाची उणीव भासूं लागते, तेव्हां कळते. पति-पुत्राच्या गुणांच्या राईचा डोंगर करावा व त्यांचे अवगुण झांकावे, आपल्या सुखाची पर्वा न करितां त्यांच्या सुखासाठीं सतत झटावें व कष्ट सहन करावे, ईश्वराजवळ त्यांच्याच हितानें अखंड चिंतन करावें, अशी जुन्या चालीरीतीची हिंदु माता, व हिंदु पत्नी यांचें उत्कृष्ट शील हाच गृहस्थाश्रमाचा प्राण होय, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. स्त्रीस्वातंत्र्याकरितां भांडणाऱ्या, स्त्रियांना काडी मोडण्याचा हक्क सांगणाऱ्या, लग्नाचीं बंधनें परपुरुषप्रेमाचे आड येतां कामा नये असें प्रतिपादन करणाऱ्या व्यक्तिस्वातंत्र्याचा दावा सांगणाऱ्या, निरुपाधिक विषयसुखासाठीं संततिनियमन, करणाऱ्या, मुलांचें दाय्यांकडून संगोपन, आणि विद्यार्थिगृहांत त्यांची वाढ इत्यादि योजना करणाऱ्या, अभागी नवयुगानें ह्या व अशा अनेक शुद्ध शीलांची माती केली आहे!

एका विनोदी सुभाषितकारानें असें म्हटलें आहे कीं, माझी आई गेली, बहीण गेली, तेव्हां आमच्या शेजारच्या स्त्रियांनीं ' आम्हांलाच माय बहिणी समजा, ' असें सांगून माझें सांत्वन केलें. पण आतां माझी पत्नी वारली तर एकहि स्त्री वरीलप्रमाणें माझें सांत्वन करायला

येत नाहीं ! ही कवीची अडचण नवयुगानें दूर करण्याचें मनावर घेतलें आहे. तात्यांचे छत्तिसावे वर्षी भरलेल्या संसारांतून त्यांच्या बरोबरीची धर्मपत्नी गेली ! त्यायोगें त्यांना जें दुःख झालें असेल त्याची कल्पनाहि असल्या नवयुगांतील माणसांस पुढें कदाचित् येणार नाहीं !

पशुपक्षांतहि मादी मेली तर नराला कांहीं दिवस तरी अवघड जात असेल, बालपणींच आई मेली तर पशुपक्षांचीं अर्भकें ‘ आई ! आई ! ’ करीत मरतहि असतील ! पण आतां ही नवसंस्कृति आमच्या मनोविकारांना पशूपेक्षांहि रानटी व निंद्य बनवूं पाहात आहे ! अशा स्थितींत आर्यसंस्कृतीचें पावित्र्य व शालीनता, किती दिवस टिकून राहणार, हें एक भविष्यकालच सांगेल !

या आधींप्रमाणें तात्यांना यावेळीं अनेक व्याधींनींहि सतावून सोडलें होतें. मधून मधून दमा खोकला होत असे. मुळव्याधीचा विकार जडला होता, निद्रानाश असेच. याशिवाय शिरेच्या वृद्धीच्या विकारानें तर त्यांना बेजार केलें होतें ! त्यावर त्यांनीं पुष्कळ इलाज केले, पण गुण येईना. अश्वत्थरूप श्रीधूतपापेश्वराची पूजा व त्यास प्रदक्षिणा घालणें, ताह्मनांत सूर्याची प्रतिमा काढून त्यास प्रदक्षिणा घालणें, असे अनेक दैवी इलाजहि त्यांनीं केले. तरी त्यांना कायमचा बरेपणा वाटेना. त्यांच्या ह्या शरीरभोगांवर पत्नीविरहाचें दुःख सारखें डागण्या देत होतें. शरीरभोगापेक्षांहि तें दुःख अधिक होतें. पण लवकरच त्यांच्या मित्रांच्या खटपटीनें पनवेलच्याच नवरे यांच्या कन्येशीं त्यांचा द्वितीय संबंध घडावा अशी वाटाघाट सुरू झाली. त्यांत टिपणाचा आलेला वांधाहि दूर झाला. आणि सर्वांत समाधानाची गोष्ट म्हटली म्हणजे चाळीसीचे घरांत गेल्यावर द्वितीय संबंध करावा न करावा अशाबद्दल त्यांचें मन अत्यंत

साशंक होतें, म्हणून व मुलीच्या पत्रिकेबद्दल वडिलांची हरकत राहूं नये व एकंदर मनाचीहि सफाई व्हावी, यास्तव तात्यांनीं श्रीसमर्थ सद्गुरु यांची संमति पत्रद्वारें विचारली होती.

त्यासंबंधीं तात्या ता. ३१ मार्च सन १९०० चे दत्तोपंत सांडूंना लिहिलेल्या पत्रांत लिहितात—"श्रीसमर्थांकडे लज्जा सोडून आज्ञा विचारली तिचें उत्तर आलें तें—' दोन्ही पत्रें पोचलीं. मजकूर समजला. तुम्ही रा. गणपतराव नवरे यांचे भगिनीशीं विवाह करावा. याबद्दल कोणच्याहि प्रकारची हरकत आमच्या मतें नाहीं. दर्शनास येण्याविषयीं इच्छा आहे असें लिहिलें. त्यास तुम्हांस जशी ईश्वरबुद्धि देईल तसें करावें.' याप्रमाणें मजकूर आहे. तो वाचून किती समाधान झालें, तें काय कळवितां येणार आहे ? ज्यांना या गोष्टीचा अनुभव आहे त्यांनाच कौतुक वाटेल." ह्या नंतर लगेच सन १९०० च्या एप्रिल महिन्यांत त्यांनीं आनंदानें कोंकणची यात्रा करण्याचें ठरविलें. कोंकणांत बोटीच्या मार्गानें प्रथमच जावयाचें असल्यामुळें दत्तोपंत सांडू यांचे मार्फत त्यांनीं जय्यत तयारी केली. धोपेश्वरीं महारुद्र, श्रीधोपेश्वराची व श्रीसद्गुरूंची महापूजा, तेथील विद्वानांचा परामर्ष आणि दुष्काळग्रस्त लोकांस अन्नदान असा त्यांचा यात्रेंतील सुमारें दीड हजार रुपये खर्च करण्याचा कार्यक्रम होता. या संबंधीं सांडूंना ते लिहितात कीं, वरील सर्व कामें मुत्सद्दीपणानें, बिनबोभाट, भपका न होतां, सात्विक धर्मानें व्हावींत."

तारीख ६ एप्रिल १९०० रोजीं सायंकाळीं तात्या बरोबरच्या मंडळीसह धोपेश्वरीं जाऊन पोहोंचले, त्यावेळीं त्यांचे बरोबर त्यांच्या मातोश्री, कनिष्ठ बंधु रामभाऊ व मेव्हणे आत्मारामपंत खेर, अशी मंडळी होती. तारीख ७ एप्रिल सन

१९०० मिति चैत्र शु. ८ शनिवारीं त्यांनीं श्रीसद्गुरूंची पूजा केली. भाविकांच्या आयुष्यांतील हा फार महत्त्वाचा प्रसंग असतो. या अत्यंत मंगल प्रसंगाचें, व त्यानंतर श्रीसद्गुरुलाभानें त्यांच्या मनावर जो परिणाम झाला त्याचें, तात्याच आपल्या वडिलांस लिहिलेल्या पत्रांत लगेच वर्णन करितात, तें महत्त्वाचें वाटत असल्यामुळें त्याचे उतारे खालीं देत आहे. " आज शनवारीं श्रीसमर्थ सद्गुरुपूजन झालें. पूजनविधि श्रीतुलसीवृंदावनासंन्निध झाला. तो आटोपल्यावर सर्व मंडळी दूर गेली. व मला कांहीं विचारणें तर विचारावें म्हणून मंडळींनीं सुचविल्यावर, विचारणा झाल्यावर जें कांहीं समर्थांनीं सांगितलें, त्याबद्दल माझी जी समजूत झाली, ती खालीं लिहीत आहे."

(१) " मनुष्य चिंतितो एक पण ईश्वरसूत्र अगदीं निराळें. नवीन योग* येत आहे, यापासून हेतु सिद्धीस जातील. (२) चालू दिवस (वर्ष सहा महिने) जगप्रलयासारखे आहेत. कोणच्या वेळीं काय होईल नियम नाहीं. हे दिवस गेल्यावर मनुष्य चांगले मिळतील व मनाचा मोह दूर होईल. (३) उपासना चालू आहे ती चालवावी. जास्त घालविल्या तर प्रदक्षिणा वाढवाव्या. (४) ईश्वर सर्वव्यापि आहे. देवालय‡ गांवाजवळ करणें उत्तम. हें त्यांतील तात्पर्य होय."

" तात्पर्य, श्रीनीं बुद्धि दिल्या वेळपासून अनुमानें फलद्रूप होत चाललीं. त्याप्रमाणें वरील अनुमानहि होणार असा जो पूर्वीचा संकल्प याबद्दल आतां श्रींच्या आशीर्वादेंकरून शंका कांहीं एक राहिली नाहीं."

---

*टीप—हा योग द्वितीय संबंधाचा असावा असें वाटतें.

‡टीप:—तात्यांच्या मनोराज्यांतील धूतपापेश्वरमंदिर.

"आजपर्यंतचा कारखान्याचा कारभार झाला.गोष्ट सिद्ध होईल तेव्हां सहज कळेल. सिद्ध नसलेलीं अनुमानें आजहि पुष्कळ शिल्लक आहेत. त्याबद्दल स्वतांस कांहीं झालें तरी हरकत नाहीं.परंतु वडिलांच्या मनाला त्यायोगें श्रम,काळजी अगर धक्का बसूं नये म्हणून रात्रंदिवस जपत आहें. तथापि कांहीं कारणांनीं वडिलांना फार त्रास होत असावा. तात्या कळवीत नाहीं असें वाटत असेल. पण मूळचा खरा हेतु तसा नाहीं. पूर्वीं कधींहि नव्हता व पुढें या जन्मांत एकाहि व्यक्तीबद्दल तसा होऊं नये, अशी श्रींजवळ प्रार्थना करीत आहें. कांहीं विचित्र घटनांनीं पूर्वीं एकाकाळीं वडिलांना अत्यंत कष्ट सोसावे लागले. याला कारण विष्णु असल्यामुळें त्याचें परिमार्जन करावें, या विचारांत मन रिकाम्या वेळीं असतें. कधीं होईल तें होवो. पण केव्हांतरी होईल हें खरें."

"श्री समर्थांचें स्वरूप, बोलणें, आचरण हीं अगदीं शुद्ध आहेत. व्यवहारास धरून सर्व कांहीं बोलणें होतें. यामुळें मन:संतापाचें, मोहाचें जें परिमार्जन होतें तें लिहून कळवितां येत नाहीं. मजसारख्या भोळया मनुष्याला सर्वच खरें वाटतें, असेंच नव्हे तर येथें त्याप्रमाणें पुष्कळ मंडळीलाच वाटत आहे."

या पत्रव्यवहारांत तात्यांचा सात्विक भाव चांगला निदर्शनास येतो. वरील पत्रांच्या नकला त्यांचे मित्रद्वय गुर्जर व सांडू यांचेकडेहि पाठविल्या जात असत. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं खास आपल्या सदर मित्रांनाच आणखी पत्र लिहिलें, त्यांत त्यांच्या अंत:करणांतील आणखीं कांहीं कप्पे खुले झाले, त्याचें दिग्दर्शन करण्यासाठीं एक दोन उतारे देतों.

"काल श्रीसद्गुरुपूजा, नैवेद्य, आज स्नान, याप्रमाणें सर्व विधि झाले. उपासनामार्ग पहिलाच सांगितला. दुर्वे दुसरा नको. मनाला स्वस्थता

लवकरच मिळेल. इत्यादि अत्यंत मधुर आशीर्वाद मिळाले. यामुळें मनःसंताप दूर झाला आहे व स्वस्थता आली आहे. उद्यां सोमवारीं महारुद्र, ब्राह्मणभोजन, वसंतपूजा आहे."

"या प्रांतीं आल्यासारखें होईल तितकें करीत आहें. पनवेलीस लक्ष लागत नसे. झोंप येत नसे. कांहीं नको असें वाटे. अशावेळीं या पवित्र क्षेत्रांत येण्याचे शरीरश्रम झालेले, व होत असलेला द्रव्यव्यय सार्थकीं लागत आहे व त्यायोगें मनःसंताप दूर होऊन भावी अवाढव्य उद्योग सुरू करण्यास श्रीसद्गुरुप्रसाद मिळविला आहे. इतकी गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे डोकें क्षणभर गुंग होऊन जातें."

"ज्या गोष्टी घडतात, त्यांचें अनुमान होणें व तें पुढें खरें होणें, इच्छा, विचार, उद्योग आणि सिद्धि या चार गोष्टी एकत्र घडून येणें फार कठीण आहे.+++ मध्यंतरीं सांखळी तुटल्यामुळें झालेल्या अत्यंत वेदनांचा परिणाम सद्गुरुकृपामृताशिर्वादांत व्हावा, या गोष्टींचें स्मरण वारंवार होऊन मेल्यावरहि, ज्या प्राण्यानें सुख दिलें, त्याचे उपकार या जन्मभर स्मरणांतून कसे बरें जातील ? इतका निष्ठुर विष्णुशर्मा खात्रीनें नाहीं. हें पत्र लिहित असतांहि अगदीं प्रथम दिवसाप्रमाणें स्थिति होत आहे ! ! !"

"येथील प्रत्येक कामीं उजव्या डोळ्यांतून आनंदाश्रु व डाव्या डोळ्यांतून दुःखाश्रु असा गंगायमुनांचा संगम प्रतिदिवशीं बाहेर येत असतो. नाइलाज आहे. श्रीकृपें श्रीक्षेत्र काशीपर्यंत प्रवास झाल्यांवर शुद्ध गंगाजलाचा प्रवाह दिसूं लागेल. अशी प्रार्थना श्रीचरणीं करीत आहें."

या पत्रांत तात्यांचें पत्नीप्रेम चांगलेंच व्यक्त होत आहे. तसेंच पतीच्या संतोषासाठीं जुन्या चालीच्या आर्यस्त्रियांची किती कळकळ असते, तेंहि या पत्रावरून व्यक्त होतें. तात्यांची पहिली बायको

अशक्त रोगी होती. ती तात्यांना म्हणे कीं तुम्ही दुसरी बायको करा. ती प्रियपत्नी स्वर्गी गेली व तेथून आपल्या पतीच्या मनाच्या शांतीसाठीं द्वितीय संबंध, श्रीसद्गुरुलाभ, असे योग तीच घडवून आणीत आहे, ही भावना भाविक प्रापंचिकाच्या दृष्टीनें मोठी रम्य आहे. या भावनेनें तात्यांचें दुःख आनंदमिश्रित केलें. निराशा व औदासीन्य यांचे मनश्चक्षूंपुढें आलेले भेसूर ढग, आतां यापुढें आपल्याला लाभदायक असेच योग घडत जाणार ह्या विचारानें, दूर केले. व त्यांचें विषण्ण झालेलें अंतःकरण हळूहळू प्रसन्न होऊं लागलें.

तात्यांनीं वर लिहिल्याप्रमाणें धोपेश्वरीं समक्ष जाऊन श्रीसद्गुरु काका-महाराज यांस शरण जाण्यापूर्वीं दत्तोपंत सांडूंच्या मार्फत किंवा पत्रद्वारां त्यांच्याकडून उपासना विचारून घेतली होती, असें त्यांच्या वरील पत्रांवरून दिसतें. तीच त्यांची उपासना श्रीनीं समक्ष भेटीच्या वेळीं कायम केली. ह्या धोपेश्वरच्या पहिल्याच यात्रेंत तात्यांची श्रीसद्गुरु-चरणीं निष्ठा चांगलीच जमली. सोमवारीं चैत्र शु. १० रोजीं महा-रुद्राचा समारंभ धोपेश्वरमंदिरांत थाटांत झाला. श्रीसमर्थ स्वतः देखरेख ठेवीत होते. " एक घटकेंतील एकादशिनी नको असें भिक्षु-कांस आधीं बजावून सांगावें. मग ब्राह्मणावर रागावल्यास देवाला कोप येतो. ' अशी त्यांची अगाऊ सूचना होती. यामुळें महारुद्राचें अनुष्ठान सावकाश व यथासांग चांगलें झालें. अनुष्ठानास ऐशीं ब्राह्मण आले होते. फालतु ब्राह्मण मंडळी देवालयांतील निरनिराळ्या देवतांपुढें अभिषेक करीत बसली होती. सायंकाळीं मंत्रजागर झाला. दुसऱ्या दिवशीं गंगापूजन झालें.

जेव्हां जेव्हां संधी मिळेल तेव्हां सद्गुरूंचें पादसंवाहन करीत बसावें, व त्यांस निरनिराळे प्रश्न विचारून शंकासमाधान करून

घ्यावें, असा तात्यांचा हा क्षेत्रवास फार लाभदायक झाला. काकांचें पुराणहि त्यांनीं ऐकिलें. त्याबद्दल तात्या लिहितात— " वाणी स्पष्ट, सरळ, समजणारी आणि विलक्षण संक्षिप्त. वायफळ शब्द त्यांत मिळणें नाहीं. फोनोमध्यें हें पुराण घेऊन ठेवणें अगदीं जरूर आहे. त्रस्त झालेल्या मनाच्या समाधानार्थ याचा उपयोग अमृताप्रमाणें होणारा आहे ! "

या खेपेस तात्यांनीं श्रीसद्गुरूंस जे प्रश्न विचारले त्यांतील नमुन्याकरितां एक सांगतों. तात्या म्हणाले कीं, " क्षत्रिय, ब्राह्मण, शूद्र, वैश्य, हरजातीच्या मनुष्याला दैविक उपाय कळविण्याची इच्छा आहे. तरी आपण आज्ञा द्याल त्या देवाची उपासना रोगनिवारणार्थ सांगतां येईल. वेळोवेळीं पत्र पाठवून कळविणें म्हणजे वेळ लागणार आहे, " त्यावर विचार करून " दत्तसेवा करण्यास सांगत जावी. सर्व जातींना हितकारक आहे. गुरुचरित्र ब्राह्मणाशिवाय वाचण्यास अधिकार नाहीं. वाचतात त्याला इलाज नाहीं. " याप्रमाणें काकांनीं उत्तर दिलें. यानंतर तात्यांच्या कार्डावर बाजूला श्रीदत्ताचें चित्र दिसूं लागलें.

या सत्संगतीचा तात्यांच्या मनाला इतका चटका लागला कीं, शिवछत्रपति ज्याप्रमाणें श्री तुकोबांचें कीर्तन ऐकून विरक्त झाले, तशी तात्यांच्या मनाची कांहीं काल स्थिति झाली. तारीख १९ एप्रिलच्या पत्रांत ते लिहितात कीं " धोपेश्वरीं राहण्यासंबंधानें मनांत येतांच डोळ्यांत प्रेमाश्रु तात्काळ येतात ! व तेथें राहावें एक, किंवा श्रींना इकडे घेऊन यावें एक, याशिवाय तिसरा मार्ग नाहीं. याबद्दल काय करावें. तें तेथें आल्यावर सावकाशपणें ठरवूं. "

" गुरूनीं ऐशी चटक लाविली मोठी " या संतवचनाचा व्यावहारिक अनुभव तात्यांनीं घेतला. त्यांचे बंधु गदाधररावजी यांनीं

येथें एक महिना राहावें. म्हणजे शरीर सुधारेल व मन पवित्र होईल; व वागावें कसें, व्यवहार कसा करावा इ. प्रकार ध्यानीं येईल. नजीक श्रीधूतपापेश्वर यांच्या कृपें पुढील आयुष्याचे सर्व दिवस समाधानांत जातील.' असें धोपेश्वराहून तात्यांनीं वडिलांस पत्र लिहिलें. पण सद्गुरुनिष्ठा ही ज्याची त्याला. ती दुसऱ्यावर लादून कसें जमणार! पण तात्यांपुरतेंच बोलावयाचें तर कांहीं काल बाईलवेडे झालेल्या तात्यांना आतां सद्गुरूंचें वेड लागलें हें खरें. यात्रा करीत करीत ते घाटांतील रस्त्यानें घरीं आले. वाटेंत केळवली, साखरपें, कोल्हापूर याप्रमाणें वाटेवरच्या गांवांतून गुरुबंधूंकडेच मुक्काम होत गेल्यामुळें, जेथें जावें तेथें श्रीसद्गुरु काका महाराज यांचेंच माहात्म्य त्यांस ऐकावयास मिळे व जेथें तेथें प्रेमपूर्वक स्वागत होई. ही सांप्रदायिक निरपेक्ष प्रेमाची नवलाई तात्यांनीं अद्याप अनुभविली नव्हती. यामुळें त्यांचें मन फारच रंगून गेलें. पुढें तारीख २७ एप्रिलच्या दत्तोपंतांना लिहिलेल्या एका पत्रांत तर तात्या लिहितात--" हल्लीं अर्धें लक्ष श्रीधोपेश्वरीं व अर्धें कारखान्याकडे लागत चाललें आहे! कारखान्याच्या कामाचा कंटाळा वाटतो! त्यांत फारच त्रास आहेत. बरें म्हणून घेण्यांत कोणास तरी सुळीं द्यावें लागतें! अगर वाईट वाटेल असें करावें लागतें! एक न्यायाधीश नेमला म्हणजे मग कारखान्याचें काम करणें सोयीचें होईल. या यात्रेंत श्रींच्या कृपाप्रसादानें अनेक अडचणी कशा दूर झाल्या त्यासंबंधीं दत्तोपंतांना पत्र लिहितांना तात्या लिहितात कीं—

"आपण गोष्टी लिहून पाठविण्याविषयीं सुचविलें, त्यास झाल्या गोष्टी या कांहीं नव्हत. प्रत्यक्ष लेखी पुराव्यासह सर्व मंडळीस थक्क करून सोडणाऱ्या गोष्टी सहा महिन्यांत आठ दहा तरी देईन म्हणतों. प्रवासांतील कांहीं गोष्टींना कांहीं लोक काळा बसण्यास व डहाळी

मोडण्यास, अथवा मनुष्यकृति अथवा सृष्टिक्रम म्हणूं शकतील. पण मजकडून श्रीकृपें ज्या मिळतील, त्यांपैकीं एकाहि गोष्टीच्या अल्पांशाबद्दलहि कुरकुर कोणास करतां येणार नाहीं. इतकी खबरदारी ठेवीत आहें."

या उताऱ्यांत तात्यांचा, गुरुसामर्थ्य व गुरुकृपा यासंबंधींचा, दृढ विश्वास चांगलाच व्यक्त होतो. यामुळें त्यांच्या मनास नवीन जोर मिळून सामान्य अडचणींना यापुढें आपण भीक घालणार नाहीं, असें मनाचें स्थैर्यहि त्यांस प्राप्त झालें.

याच सुमारास त्यांच्या कारखान्यांतील अगदीं आरंभींचे नोकर गणपतराव जोशी यांनीं राजीनामा देऊन पनवेलींत सर्वसंग्रह नामक दुकान काढण्याचें ठरविलें व हनुमान प्रासादिक देशी दवाखानाहि काढण्याचें त्यांनीं योजलें. असे कांहीं चुरशीचे प्रयत्न, व मत्सरग्रस्त टीका, त्यांच्या कानीं येत. पण त्यामुळें चित्तक्षोभ होऊं न देतां शांतपणें विरोधांस पचविण्याचा अभ्यास ते करूं लागले. उदाहरणार्थ ते लिहितात, 'एक सातबारी वाग्बाणांचा फटाका कोणी विघ्नसंतोषी गृहस्थांनीं टाकिला! त्याचा पहिला बार चि. गदाधर याचे मनास लागला, दुसरा बार हळूच ती. अण्णांना (वडिलांना) लागला. तिसरा मोठा बार मजवर आला, तो धरून आवाज होण्यापूर्वींच दाबून विझविला. नाहीं तर मोठा आकांत होणार होता!"

"अशा प्रकारें इकडे रोज कामें उपस्थित होताहेत! यांचें पर्यवसान स्वतःचें मन कमविण्याकडे उत्तम रीतीनें होत आहे."

याप्रमाणें तात्यांची धोपेश्वरची पहिली यात्रा व त्याची फलश्रुति याचें संक्षिप्त वर्णन बहुतेक त्यांच्याच शब्दांत केलें. यात्रा पुरी करून घरीं आल्यावर त्यांनीं आप्तइष्ट व नवीन संबंध जोडलेले "सांप्रदायिक गुरुबंधु यांस बोलवून यात्रेची सांगताहि केली व

श्रीगुरूंस यात्रेची पावतीहि पाठविली. त्यांत ते लिहितात 'श्रींच्या कृपेनें आडिवरें येथील महाकाली, श्रीआर्यादुर्गा, श्रीब्राह्मणदेव, श्रीजगदंबा क्षेत्र करवीर, नरसिंहवाडी, औदुंबर या क्षेत्रीं अल्प कांळ राहून दर्शन, पूजन, ब्राह्मणभोजन होऊन परत आलों. ... ... ... श्रींनीं आशीर्वादरूप आज्ञा दिल्याप्रमाणें या मृत्युलोकींचा प्रपंच साधून अंतीं परमार्थसाधन होईल, अशा मार्गानें जाण्याविषयीं काया-वाचा-मनेंकरून झटत आहें.'

यानंतर सन १९०० च्या मे महिन्यांत वैशाख शु. १२ रोजीं तात्यांचा दुसरा विवाह झाला. पनवेलचे गोविंदराव उर्फ बाबा नवरे यांची एकुलती एक मुलगी त्यांस दिली. या द्वितीय कुटुंबाचा जन्म अमावास्येचा असल्यामुळें या शरीरसंबंधास तात्यांचे वडील विरुद्ध होते. पण मुलीचे बंधु रा. गणपतराव नवरे हे तात्यांचे स्नेही असल्यामुळें त्यांच्या आग्रहास्तव हा योग जमून आला व त्यास श्रीसद्गुरूंची संमतिहि मिळाली.

पण या विवाहानंतर तात्यांना व त्यांच्या द्वितीय कुटुंबालाहि दुखण्यांनीं बरेच दिवस बेजार केलें! तात्यांचे वडील महायात्रेला जावयाचे होते, तेहि प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें जाऊं शकले नाहींत. सन १९०० सालापासून पुढें पदोपदीं श्रीसद्गुरूंना विचारून काय तें करावयाचें, असा तात्यांचा वर्तनक्रम सुरू झाला. श्रीसद्गुरूंच्या सांगण्यावरून सर्व अरिष्टशांत्यर्थ वैशाख व॥ ७ शके १८२२ ता. २१ मे सन १९०० सोमवारपासून दर सोमवारीं तात्यांचे घरीं लघुरुद्र सुरू झाला. लघुरुद्राला बहुधा त्यांचे कनिष्ठ बंधुच बसत. ब्राह्मणभोजनाचें उदक सोडण्यास ते येत. यानंतर तात्यांचा मधून मधून कांहीं काळ आनंदांत गेला असावा. तारीख ११ आक्टोबर सन १९०० चे ह्या लेखकास आलेले पत्रांत 'दोन चार दिवस मनो-

राज्याच्या ब्रह्मानंदांत गेले.' असा उल्लेख आहे. त्यानंतर दत्तोपंत सांडू यांस लिहिलेले तारीख ३० डिसेंबर सन १९०० चे पत्रांत ते लिहितातः—

"गतवर्षीपासून विशेष रीतीनें माझ्या असें नजरेस आलें आहे कीं, या कारखान्याचा चालक विष्णु नांवाची जी व्यक्ति आहे ती नाहीं! तसें असतें तर आज विष्णूला जो एक शरीरभोग व मनस्ताप होत आहे, त्याच्यामुळें या कारखान्याच्या भरभराटीला कमीपणा खचित आला असता! कारण विष्णु हा हल्लीं कांहीं एक करीत नाहीं! याचें उदाहरण गेल्या दोन तीन महिन्यांत मुंबई एजंटनीं अनेक प्रकारें परीक्षा पाहिलेले प्रसंग होत!"

"विष्णु व्यक्तीच्या हातांत जर पूर्वीप्रमाणें कारभार असता, तर ही गडबड बिलकुल खपली नसती! मात्र त्याला या गोष्टी घडत आहेत व भिंती आड कोणी तरी आहे, असें खचित वाटत आहे. इतकी गोष्ट खरी आहे."

"श्रीधूतपापेश्वर संस्थेच्या पूर्ण भरभराटीची जी कल्पना म्हणून मनांत येते ती मनांत आल्यावेळीं मन आणि देह हे भिन्न होतात. आणि ती वेळ व ती भरभराट पाहणाराचें भाग्य फारच फार थोर असलें पाहिजे, असें वारंवार वाटत आहे! या गोष्टीला वीस वर्षांहून अधिक दिवस नको आहेत. आणि पूर्वीच्या मंडळींनीं सोडूं नये, असें वाटणें साहजिक आहे! आणि कोणीं सोडलेंच तर याहून अधिक योग्यतेची मंडळी मिळण्याकरितां ही सुटका होत आहे, असें मानण्यास गतचैत्रांत श्रींनीं जे आशीर्वाद दिले व एक दोन हरवलेल्या मंडळीऐवजीं जी मिळाली आहे, तीवरून अनुमान सार्थक करण्यास कांहीं हरकत नाहीं!"

या पत्रांतील विस्तृत उतारा देण्याचें कारण यांत तात्यांचा ईश्वरार्पणपूर्वक कर्मयोग, निःसंगता, ध्येयवाद, आशावाद, असे त्यांच्या मनाचे बरेच पैलू दिसून येतात.

तात्यांना पनवेल येथें विचारविनिमयास कोणी बरोबरीचे व सहानुभूतीचे स्नेही लाभले नसावेत, त्यामुळें त्यांचा पत्रव्यवहारावर फार भर आहे. त्यांचीं खाजगी पत्रें कित्येक वेळां मध्यरात्रीं तर कित्येक वेळां पहांटे चार वाजतां लिहिलीं गेलीं आहेत. त्यांच्या मनांत नेहमींच विचारांचें इतकें काहूर माजे कीं त्यास पत्रद्वारें वाव दिल्यावांचून त्यांस हलकेपणा वाटत नसे. श्रीसद्गुरु काका पुराणिक यांच्याशीं त्यांचा सतत पत्रव्यवहार सुरूं असे. तात्यांच्या पत्रांत त्यांच्या घराच्या व कारखान्यांतल्याच अडचणी नव्हे तर त्यांचे आप्त इष्ट, मित्र, एजंट, ग्राहकरोगी, सर्वांच्याच अडचणी ते काकांस विचारीत. त्यांच्या लांबलचक पत्रांचीं उत्तरें दोन चार ओळींतच काकांकडून येत. व त्या बरोबर अंगाराहि असे. या पत्रद्वारें होणाऱ्या भेटीशिवाय तात्या दरसाल माघाचे सुमारास कोंकणांत श्रींचे दर्शनार्थ जात व तेथून नवीन उमेद घेऊन येत. सन १९०१ चे जुलै महिन्यांत तात्या बरेच आजारी होते. तन्निमित्त नारायण भट्टी ग्रहमख केला. अद्याप कांहीं काल संकटाचा जावयाचा होता म्हणूनच कीं काय तात्यांचे निरनिराळे बेत काका लांबणीवर टाकीत होते. तरी या अडचणींत औषधें घेण्याची रीतीची आठवी आवृत्ति सन १९०१ सालीं निघाली.

तात्यांच्या थोरल्या मुलीचें लग्न सन १९०२ चे मार्चांत झालें. सन १९०३ सालीं काळ फार कठीण आला आहे, अशी सूचना त्यांस काकांकडून मिळालीच होती. व तसा त्यांना अनुभवहि येत होता. पनवेलीस प्लेगनें भयंकर रूप धारण केलें होतें ! आठ दिवसांत तीस माणसें प्लेगला बळी पडलीं ! तात्यांचें शिरेचें दुखणें असाध्य कोटींत गेलें ! सर्वांत

कनिष्ठ बंधू रामभाऊ यांच्या स्वैर वर्तनाबद्दल तात्या फार काळजींत पडले. द्वितीय कुटुंबाची तब्येत फार नादुरुस्त झाली. त्यामुळें तात्या पुन्हां जिकीरीस येऊन श्रीसमर्थांस लिहितात कीं:—"आज पर्यंत मला एकट्याचीच काळजी होती, पण आतां ही दुसरी उपस्थित झाली आहे व काय करावें हें सुचत नाहीं. कधीं कधीं तर औदासिन्य इतकें होतें कीं, हात उचलावा असेंहि वाटत नाहीं. कांहीं तरी पूर्वजन्मींचें भोक्तृत्व भोगावें लागत आहे. पण असे फार दिवस जाणें कठीण वाटत आहे! ईश्वर आतां किती बरें अंत पाहणार!"

पण प्रारब्ध भोगल्यावांचून सरत नाहीं. आणि सद्गुरु झाले तरी प्रारब्धगतींत ते सहसा हात घालीत नाहींत. तात्या वरचेवर दैविक इलाज विचारीत. भृगुसंहितेंत सांगितलेले पूर्वजन्मींचे परिहार करावे काय? असेंहि त्यांच्या मनांत येई. पण श्रीसद्गुरूंनीं त्यांना निक्षून कळविलें कीं, एका अध्यात्मरामायणाच्या पठणांत सारे परिहार आले. अध्यात्म रामायणाचे पांच अध्याय रोज सावकाश वाचावे व ते पत्नीस ऐकवावे. यांत सर्व आलें. त्याप्रमाणें तात्या करीत होते. पण प्रारब्धभोगांनीं त्यांना व त्यांच्या कुटुंबाला सोडलें नाहीं. सन १९०३ सालीं तात्यांचें कुटुंब पुन्हा आजारी झालें. त्यावेळीं त्यांना कांहीं दिवस गेले होते. वेडी आशा, तिनें तात्यांना वेडें केलें होतें. पण त्या आजारांत त्यांच्या कुटुंबाचा गर्भपात झाला! असें दोनदां झालें! तेव्हां तात्या फार निराश झाले. ता. २७ नवंबर १९०३ चे एका पत्रांत ते अत्यंत निराशेनें श्रीसद्गुरूंस एक परम जिव्हाळ्याचा प्रश्न विचारतात कीं "कारखान्याला योग्य चालक पुत्र काम करीत असतां पाहण्याइतकें पुण्य माझे पदरीं आहे काय? का आजपर्यंत अनेक वेळां निराशा झाल्या, तशाच अखेरपर्यंत होणार! मन अगदीं गोंधळून जाऊन निराश झालें आहे! यास काय उपाय करावा?"

यानंतर सन १९०४ सालीं तात्या धोपेश्वरीं गेले. याच सालीं त्यांनीं मुंबईचे शिल्पकार गणपतराव म्हात्रे यांचेकडून काका महाराजांची एक मोठी संगमरवरी दगडाची मूर्ति तयार करविली. व तारीख २७ एप्रिल सन १९०४ रोजीं श्रीसमर्थांना पनवेलीस आणून त्यांच्याच विद्यमानें [ त्यांच्या हस्तें नव्हे ] तात्यांनीं त्या मूर्तीची सर्वाधिष्ठाता या नामरूपानें प्राणप्रतिष्ठा विधिपूर्वक केली. तो प्राणप्रतिष्ठेचा समारंभ फारच मोठा थाटाचा झाला. यासमयीं तात्यांनीं श्रीसद्गुरूंस अगोदर लिहिलेल्या पत्रांत ते त्यांची प्रार्थना करितात कीं– "आज पांच वर्षांत श्रींनीं माझ्या देहाचें, कुटुंबाचें व कारखान्याचें अनेक प्रकारें संगोपन केलें. आतां हा द्वादशीचा दिवस म्हणजे संकटदशेची समाप्तिच होय. या आनंददायक मंगलसमयीं परमपूज्य सद्गुरुहस्तें श्रीसर्वाधिष्ठाता यांची प्राणप्रतिष्ठा व्हावी, असा मनाचा संकल्प आहे. तो श्री जाणत आहेत. विशेष मीं लिहावें असें नाहीं. पुरविणेंविषयीं श्रीचरणीं प्रार्थना करीत आहें."

सन १९०४ सालीं टोळधाड आली. सन १९०५ चे आरंभीं श्रीसमर्थांची स्वारी पनवेलीस आली. तात्यांनीं मोठा समारंभ केला. त्यानंतर मार्च महिन्यांत तात्या एकदां पनवेलजवळील आदईच्या डोंगरावर गेले. त्या डोंगरावर वरतीं पठार आहे. व तेथें जवळपास पाण्याचीहि सोय करतां येणें शक्य आहे. तेथील देखावा व सोयी पाहून तात्यांच्या श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिराच्या कल्पनेनें एकदम इतकी उचल खाल्ली कीं हर्षवायूप्रमाणें त्यांचे ते विचार डोक्यांत मावत ना! त्यामुळें ते पांचसहा दिवस निजून होते! सन १८९८ ते १९०६ या संकटकालींही तात्यांचा कारखाना आर्थिकदृष्ट्या वाढतच होता. त्याच्या प्रगतींत कधींच खंड पडला नाहीं. त्याच्या कॅटलागांच्या सुधारलेल्या आवृत्ति एकामागून एक निघतच होत्या. कारखान्याच्या

इमारतींत तळघरादि निरनिराळ्या सुधारणा होतच होत्या. कुमारी आसवासाठीं येणारे कोरफडाचे मचवे येतच होते. औषधविक्री करणाऱ्या एजंटांची संख्या ऐंशीवर गेली होती. तसेंच तयार औषधांची संख्या तीनशें चवऱ्यांयशीपर्यंत वाढून सुमारें ऐशी काढ्यांचाहि जाहिरातींत उल्लेख असे. औषधें घेण्याची रीति या पुस्तकाची नववी आवृत्ति माघ शु. ५ संवत १९६० ता. ४ जानेवारी सन १९०३ रोजीं प्रसिद्ध केली त्यांत तात्या लिहितात—

"भक्तजनांचे मनोरथ पुरविणें व रोग हरण करणें यांविषयीं श्रीधूतपापेश्वर हें मोठें कडकडीत पण भोळें दैवत होय. आमचें उपास्य श्रीधूतपापेश्वर, सबब त्यांचेंच नांवानें येथें संस्था स्थापन केली असून त्यांचें मंदिरही लवकरच होणार आहे, व सर्व व्यवस्था श्री मालक अशा रीतीनें चालत आहे; श्रींचे कृपेनेंच संस्थेचें मुख्य पोषक अंग आर्यौषधिकारखाना तो दिवसेंदिवस ऊर्जितावस्थेंत येत आहे. असें या पुस्तकांतील नवीन औषधांची वृद्धि व एजंट यांच्या संख्येची वाढ पाहून संस्थेच्या दूरस्थ हितचिंतकांच्या ध्यानीं येणार आहे."

"मुळें तोडणें, चूर्ण करणें, रस किंवा तेल दाबून काढणें इत्यादि कामें यांत्रिकशक्तीनें व्हावींत, याकरितां इन्जिन् व इतर यंत्रसामुग्री आणलेली असून यंत्रांच्या सोईची इमारत पुरी होत आली आहे; लवकरच वरील कामें सुरू होतील. रसायनें, मात्रा वगैरे खलण्याचे मोठमोठे खल नवीन युक्तीचे, उत्तम गारयुक्त, न झिजणाऱ्या दगडांचे बनविलेले असून, तेही यांत्रिकशक्तीनें चालवितां येतील, असें पूर्ण अनुमान आहे. काढे कढविणें; तेलें, मलमें वगैरे तयार करणें याकरितां मोठमोठीं भांडीं, तसेंच अर्कपात्रही उत्तम सुधारणेचें बनविलेलें असून सोईकर भट्ट्याही केल्या आहेत. या सर्व साधनांनीं औषधें



श्रीधूतपापेश्वर कारखान्यासाठीं विपुल प्रमाणांत जलमार्गानें येणारें कोरफड. [ पृ. २७४

वेळचेवेळीं यथाशास्त्र तयार होण्यास उत्तम मदत होत आहे. शिवाय वजन करण्याचे कांटे वगैरे औषधोपयोगी उपयुक्त वस्तूही तयार व्हाव्या, अशी व्यवस्था चालू आहे. ह्या सर्व गोष्टी प्रत्यक्ष कारखाना पाहणारांस दिसून येतील."

"पुढील खेपेपासून या पुस्तकाचें नांव व्यवहारवैद्यक, भाग पहिला 'औषधें घेण्याची रीति' असें होईल. शिवाय आजपर्यंत यांत आलेले निरनिराळे अपुरे विषयांचीं निराळीं पुस्तकें व्यवहारवैद्यक या नांवानें भागवारीनें प्रसिद्ध होतील."

यानंतर सन १९०५ सालीं आपल्या सत्तेंतील एक छापखाना असावा म्हणून गणपतराव जोशी यांचा जुना विजय प्रेस तात्यांनीं गहाण घेतला व पुढें लवकरच तो विकतहि घेतला.

आपल्या पुढच्या बेतबातांस विस्तृत जमिनीची आवश्यकता आहे हें जाणून ते मोठालीं इष्टेटें घेण्याचे नादीं लागले. एका ठिकाणीं पांचशें एकर गुरचरणी जमीन आपल्याला मिळावी म्हणून त्यांनीं सरकारांत अर्ज दिला. सन १९०५ चे मे महिन्यांत राजापुरची गंगा आल्यावेळीं त्यांना दर्शनार्थ येण्याविषयीं श्रीसद्गुरूंची तार आली त्यावरून ते धोपेश्वरीं गेले. त्या खेपेस हा लेखकही त्यांचेबरोबर धोपेश्वरीं प्रथमच गेला होता. त्याचखेपेस त्यानेंहि वैशाख. वा॥२ शके १८२७(स. १९०५) शनवारींच श्रीसद्गुरूंचा अनुग्रह घेऊन तात्यांशीं गुरुबंधूचें नातें जोडलें. तात्यांनीं या खेपेस श्रीगंगामाईचे कांठीं महारुद्र करून त्याची सांगता केली. तो समारंभहि प्रेक्षणीय झाला. अशा अनुष्ठानाचे समारंभ यापुढें पाहण्यास मिळणें कठीण !

तात्या राजापूरच्या गंगामाईची यात्रा करून आल्यानंतर थोडेच दिवसांनीं त्यांचे वडील आजारी पडले. व थोडेच दिवसांचे आजारांत तारीख १९ जुलै सन १९०५ रोजीं त्यांचा अंत झाला ! ती

दुःखकारक हकीकत श्रीसद्गुरूंना कळवितांना तात्या लिहितात—
" बुधवारीं रात्रीं सव्वाआठ वाजतां वडिलांना श्रीधूतपापेश्वर दूत घेऊन गेले ! त्यांचें सर्व ठीक झालें. परंतु आम्हाला वडील नाहींसे झाले ! यामुळें फार वाईट वाटत आहे.... श्रीरामचंद्रासारख्यांना पितृसुख लाभलें नाहीं, इत्यादि गोष्टी मनांत आणून मी मनाचें सांत्वन करीत आहें. परंतु अद्याप तें बिलकुल ऐकत नाहीं. ती० अण्णा होते, त्या ठिकाणीं अद्याप जाववत नाहीं. त्यांचें फडताळ-पेटी उघडीत नाहीं. वरच्यावर सर्व चाललें आहे.... वडील घरांत होते तों पाहिजे त्यावेळीं पाहिजे तेथें जातां येत असे. परंतु आतां तसें साधणें नाहीं. पूर्वीं मागें कधींच पहावें लागत नसे. घरांत तर मुळींच कांहीं मला माहीत नाहीं. असो. आतां चारी बाजूंनीं मनाला व्यग्रता झाली आहे ! "

तात्पर्य, पुरुष कितीहि कर्तृत्ववान् असो, तो धर्माचरणांत रत असो, संतांची त्याचेवर कृपाहि असो, प्रारब्धांत ज्यावेळीं जे आघात व्हावयाचे ते कशानेंहि टळत नाहींत. यास्तव ते शिवगुरुकृपेनें टळतील अशी अपेक्षा सूज्ञांनीं न धरतां संकटकालांतून सद्धर्मानें पार पडण्यास श्री शिवगुरूंनीं मला धैर्य द्यावें, इतकेंच मागणें योग्य होईल. प्रापंचिक संकटनिरसन यास श्रीगुरुप्रसाद न मानतां खरा श्रीगुरुप्रसाद म्हणजे सदाचार आणि सद्विचार हाच होय.

**ज्याला नीति वदे बृहस्पति करीं वज्रा अशीं आयुधें।**
**विष्णूचें बळ शुभ्र वारण तशीं स्वर्गादि नानाविधें।**
**दुर्गें सैनिक देव यद्यपि तरी युद्धीं पळे वृत्रहा।**
**धिक् धिक् पौरुष यत्न यास्तव खरें प्रारब्ध मोठें पहा !॥ २॥**

**भर्तृहरि समश्लोकी.**





श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्यांतील यांत्रिक खल.

[ पृ. २७६



# प्रकरण २१ वें

## संतांचा सदाचार

**सच्चिदानंदकंदाय जगदंकुरहेतवे ।**
**सदोदिताय पूर्णाय नमोनंताय विष्णवे ॥ १ ॥**
**सर्ववेदांतसिद्धांतग्रथितं निर्मलं शिवम् ।**
**सदाचारं प्रवक्ष्यामि योगिनां ज्ञानसिद्धये ॥ २ ॥**

[ सच्चिदानंद परिपूर्ण । या जगद्वृक्षाचें कारण । अनंत विष्णूतें नमन । सदोदितासी ॥ १९ ॥ सर्व वेदार्थ गुंफिला ज्यांत । कल्याणरूप मल-रहित । जेणें योगियां ज्ञान प्राप्त । सदाचार बोलूं ऐसा ॥ ११४ ॥ सिद्धाचें जें लक्षण । बोलतां नये साधकेंवीण । साधकासी लागे करणें । ज्ञानियां सहज ॥ १२६ ॥ ]

ह्या त्रिकांडात्मक चरित्राचें हें मध्य कांड उपासना नामक सुरू आहे. मनुष्य धार्मिक अधार्मिक कसाहि असो, त्याच्या आयुष्याचा मध्य-काल बहुधा उपासनात्मकच असतो. ह्या मध्यकालाचे आरंभीं त्याच्या ध्येयाची स्पष्ट अगर अस्पष्ट कल्पना त्याच्या अंतःकरणांत उदित झालेली असते; व त्या ध्येयसिद्धीकरितां काय काय उद्योग

करावे, कोणत्तीं साधनें अनुसरावीं, इत्यादि गोष्टींचा तो मोठ्या नेटानें व उत्साहानें विचार करीत असतो. भावी कर्तृत्वाला अत्यंत पोषक असा हा आयुष्याचा मध्यकाल फारच महत्त्वाचा असतो. मनुष्याची बुद्धि प्रौढ झालेली असते. जगाचा बरा वाईट अनुभव त्यास आलेला असतो. ज्याला 'गद्धेपंचविशी ' म्हणतात, त्या तरुणपणाच्या उच्छृंखल वृत्तींतून तो पार पडलेला असतो. मदांधता आणि विषयांधता जाऊन त्याच्या ठिकाणीं सारासार विचारशक्ति आलेली असते. याप्रमाणें पूर्ववयांतील अपरिपक्कता व उत्तर वयांतील परिपक्कता याच्या संधीवर तो असतो. ध्येय कोणतेंहि असो, त्या ध्येयाच्या उपासनेचा हाच काल मुख्य होय.

माझ्या चरित्रनायकाचें मन आधिव्याधींनीं व्याप्त होतें. त्यांच्या अहंकारापुढें श्रीधूतपापेश्वर कारखाना हा पुरुषार्थ होता. त्यांच्या चित्तांत त्यागवृत्ति दृढ मूल होती. आणि त्यांच्या बुद्धीपुढें श्रीसद्गुरु काकांचें उज्वल दृश्य होतें.

तात्यांचें ध्येय चतुर्विध पुरुषार्थांपैकीं मुख्यतः धर्म हें होतें. अर्थ आणि काम हे त्या पुरुषार्थाचे अनुषंगानें येत होते, इतकेंच. धर्म हा पुरुषार्थ प्रवृत्ति आणि निवृत्ति यांच्या संधीवर आहे. कारखान्याचे व्याप सोडून धोपेश्वरीं श्रीसद्गुरुसन्निध राहावें व आत्मकल्याण साधावें असे उत्कट विचार कांहीं काल तात्यांच्या मनांत येत, पण त्यांच्या ठिकाणीं रजोगुणाचें प्राधान्य असल्यामुळें पुढें त्यांचें मन कारखान्याचे आकांक्षेकडे ओढलें जाई. त्यांचें मन याप्रमाणें बहुधा प्रवृत्तिपर व क्वचित् निवृत्तिपर असलें,तरी आपले मार्ग-दर्शक श्रीकाका महाराज आहेत, अशी त्यांची निष्ठा होती. सांप्रदायिक या दृष्टीनें त्यांच्या मनाची जी अनिश्चित स्थिति होती, तशी पुष्कळांची असेल. सद्गुरूंच्याबद्दल सांप्रदायिकांची व्यवहारतः काय भावना असते,

त्याचें किंचित् दिग्दर्शन मागें झालेंच आहे. व तेथें हेंहि दर्शविलें आहे कीं, सांप्रदायिकांची ही भावना सदोष आहे. तेव्हां सद्गुरूंचें खरें स्वरूप कोणतें हें सांगणें क्रमप्राप्तच झालें. सनातनीयांच्या प्रत्येक गृहांत ज्याप्रमाणें एक देवघर म्हणून असतें, त्याचप्रमाणें सनातनी गृहस्थाश्रमाचे वर्णनांत सनातनी हिंदुधर्माप्रमाणें मानवी जीवनाचा अत्युच्च आदर्श अवश्य संग्रहित असावयास पाहिजे. पण तो वर्णन करण्याचा अधिकार माझा नाहीं, हें जाणून सत्पुरुषांस व सद्ग्रंथांस शरण जाऊन त्यांच्या मुखानेंच आदर्शभूत असा सद्गुरुस्तव करावा असें योजलें आहे. उपासना हा ह्या चरित्रग्रंथाचा गाभा आहे. हा ग्रंथ फारसें विषयांतर न करितां शक्य तितका उद्बोधक व्हावा, व आर्य-संस्कृतींतील मानवी जीवनाचें रहस्य यांत प्रतिबिंबित व्हावें अशी लेखकाची इच्छा आहे. यास्तव अशा प्रकारच्या ग्रंथाच्या पूर्ततेकरितां संतांचा सदाचार व सद्विचार हीं सद्गुरूंच्या अंतरंगाच्या वर्णनाचीं प्रकरणें ह्या चरित्रग्रंथांत मला आवश्यक वाटत आहेत.

**प्रातःस्मरण**—तात्यांचे श्रीसद्गुरु समर्थ काका पुराणिक प्रातः-स्मरण कसें करीत, तें पूर्णपणें समजणें व सांगतां येणें शक्य नाहीं. तथापि, शाब्दिक दृष्टीनेंच पहावयाचें तर ते श्रीसद्गुरु–पादुकांपुढें बसून पुढील दोन स्तोत्रें कोणाला दूर ऐकूं जाणार नाहींत, इतकीं हळू व अति सावकाश म्हणत असत. हा त्यांचा गंभीर स्तोत्रपाठ ऐकून आणि दीर्घ तपानें व वयानें वांकलेल्या त्यांच्या शरिराची दंडनति पाहून, त्यांच्या काये-वाचेप्रमाणें मनहि श्रीगुरुचरणीं कसें लीन झालें आहे, याची पाहणारास किंचित् कल्पना होई; व तितक्यापुरती तरी पाहणारांची क्षुद्र अहंता ढेंकळासारखी विरघळून जाई!

**श्रीसद्गुरुस्तोत्र—**

आनंदमानंदकरं प्रसन्नम् । ज्ञानस्वरूपं निजबोधरूपम् ।
योगींद्रमीड्यं भवरोगवैद्यं । श्रीमद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ १ ॥

शोषणं पापपंकस्य । दीपनं ज्ञानतेजसः ॥
गुरुपादोदकं सम्यक् । संसारार्णवतारकम् ॥ २ ॥

अज्ञान-मूल-हरणं । जन्मकर्मनिवारणम् ।
ज्ञानवैराग्यसिद्ध्यर्थं । गुरुपादोदकं पिबेत् ॥ ३ ॥

गुरुपादांबुपानंच । गुरोरुच्छिष्टभोजनम् ।
गुरुमूर्तेः सदा ध्यानं । गुरुस्तोत्रं सदा जपेत् ॥ ४ ॥

काशीक्षेत्रनिवासोऽसौ । जान्हवीचरणोदकम् ।
गुरुर्विश्वेश्वरः साक्षात् । तारकं ब्रह्मवाचकम् ॥ ५ ॥

न गुरोरधिकं तत्त्वं । न गुरोरधिकं तपः ।
तत्त्वज्ञानात्परं नास्ति । तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६ ॥

ध्यानमूलं गुरोर्मूर्तिः । पूजामूलं गुरोः पदम् ।
मंत्रमूलं गुरोर्वाक्यम् । मोक्षमुलं गुरोः रुपा ॥ ७ ॥
मन्नाथस्त्रिजगन्नाथो । मद्गुरुस्त्रिजगद्गुरुः ।
ममात्मा सर्वभूतात्मा । तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ८ ॥

संसारसागरसमुद्धरणैकमंत्रम् । ब्रह्मादिदेवमुनिपूजितसिद्धमंत्रम् ॥
दारिद्र्यभयशोकविनाशमंत्रम् । वन्दे महाभयहरं गुरुराजमंत्रम् ॥ ९ ॥

न गुरोरधिकं, न गुरोरधिकं । न गुरोरधिकं । न गुरोरधिकं ।
शिवशासनतः । शिवशासनतः । शिवशासनतः । शिवशासनतः ।
इति श्रीशिवविरचितं गुरुस्तोत्रं संपूर्णम् । श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ।

**श्रीशंकराचार्यकृत गुर्वष्टक—**

शरीरं सुरूपं तथा वा कलत्रं । यशश्चारु चित्रं धनं मेरुतुल्यम् ।
मनश्चेन्न लग्नं हरेरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ १ ॥

कलत्रं धनं पुत्रपौत्रादि सर्वं । गृहं बांधवाः सर्वमेतद्धि जातम् ।
गुरोरंघ्रिपद्मे मनश्चेन्न लग्नम् । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ २ ॥
षडंगादिवेदो मुखे शास्त्रविद्या । कवित्वादि गद्यं सुपद्यं करोति ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ३ ॥
विदेशेषु मान्यः स्वदेशेषु धन्यः । सदाचारवृत्तेषु मत्तो न चान्यः ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ४ ॥
क्षमामंडले भूपभूपालवृंदैः । सदा सेवितं यस्य पादारविन्दम् ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ५ ॥
यशो मे गतं दिक्षु दानप्रतापात् । जगद्वस्तु सर्वं करे यत् प्रसादात् ।
गुरोरंघ्रिपद्मे मनश्चेन्न लग्नम् । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ६ ॥
न भोगे न योगे न वा वाजिराजौ । न कांतामुखे नैव वित्तेषु चित्तम् ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ७ ॥
अरण्ये न वा स्वस्य गेहे न कार्ये । न देहे मनो वर्तते मे त्वनर्घ्ये ॥
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ८ ॥
अनर्घ्याणि मुक्तानि रत्नानि सम्यक् । समालिंगिता कामिनी यामिनीषु ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे । ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ ९ ॥
गुरोरष्टकं यः पठेत्पुण्यदेही । यतिर्भूपतिर्ब्रह्मचारीच गेही ।
लभेद्वांछितार्थं पदं ब्रह्मसंज्ञम् । गुरोरुक्तवाक्ये मनो यस्य लग्नम् ॥ १० ॥

श्रीसद्गुरुपादुकांपुढें बसून श्री. काकामहाराज अत्यंत नम्र भावानें करुणा भाकीत, तोच अरुणोदय आणि त्यांचा अनन्य शरणागतिरूप विचार हेंच प्रातःस्मरण होय. शिवराम स्वामी म्हणतात—

> “ गुरुकरुणोदयकाळीं शिवगुरुवर गीतीं गावा ।
> स्वहिता कारणें आपुला आपणचि विचार करावा ” ॥

हें जें “ साधकाचें साधन आणि सिद्धाचें समाधान ” ह्याचेंच नांव सदाचार. श्रीसद्गुरु काका महाराज यांचीं जीं लक्षणें तींच आमचीं

साधनें होत. सिद्धांच्या लक्षणांतील रहस्य सामान्यबुद्धीस कळत नाहीं. यामुळें सामान्य साधनानुष्ठानहि कच्चेंच होतें. साधु होऊनच साधूंस जाणावें, असें म्हणतात. यास्तव श्रीद्गुरूंच्या प्रातःस्मरणादि सदाचार व सद्विचारांचें रहस्य श्रीशंकराचार्यांचेच मुखानें ऐकावें तें योग्य. यास्तव श्रीमच्छंकराचार्य आपल्या सदाचार नामक लहानशा प्रकरणांत सदाचार व सद्विचार यांचें संक्षिप्त निरूपण करितात, तें त्यावरील ओवीबद्ध प्राकृत सुबोध टीकेंतील निवडक वेंच्यासह पुढें देत आहे.

**प्रातः स्मरामि देवस्य सवितुर्भर्ग आत्मनः।**
**वरेण्यं तद्धि यो यो नश्चिदानंदे प्रचोदयात् ॥ ३ ॥**

परमात्मा आमुच्या बुद्धी। प्रेरीतसे चिदानंदीं। तोचि आत्मा निरवधी। प्रभातीं स्मरों ॥ २३९ ॥ अज्ञानतमाचा अंत । ज्ञानसूर्य प्रभा करीत। यासी बोलिजे प्रभात। दोहींकडे सारिखा॥२४३॥ साधक विचारा पवर्तला। तयाचा हा प्रभात बोलिला । ज्ञानाचा अरुणोदय जाहला। विचारूप ॥ ५२ ॥ हाचि ब्राह्ममुहूर्त बोलिजे । येथेंचि स्वसुखा लाहिजे । साधक विचारें उमजे। ब्रह्मत्व आपुलें ॥ ५३ ॥ आकाश जैसे घटांतरीं । तैसा कूटस्थ निर्विकारी । आकाश न लिंपे पदार्थमात्रीं। आत्मा वृत्तीशीं अलिप्त ॥ ५८ ॥ स्वतां चुंबका नव्हे चळण । आणि न घडे चाळकपण। परी झालें जें भ्रमण । हा आळ कोणासी ॥ ६६ ॥ आतां चाळकाचा संकल्प । कोठें करावा आरोप । यास्तव प्रेरक आत्मस्वरूप । उपाधि-योगें बोलिलें ॥ २७१ ॥ आत्मा बुद्धीचा प्रेरक । तत् तें व्याप्त सद्रूप एक। देव तोचि प्रकाशक। चिद्रूप जें कां ॥ ३१६ ॥ सविता हाचि जगद्हेतु। भर्ग शब्दें सर्वां जाळितु। आनंद सातिशयरहितु। वरेण्य ऐसा ॥ १७ ॥ तत् देव वरेण्य तीन्ही। जाणिजे हें स्वभावलक्षणीं। सविता भर्ग प्रेरकपणीं। आगंतुक लक्षण ॥ १८ ॥ दोन्हीही लक्षणेंकडून। जाणावें ब्रह्मचि परिपूर्ण। एवं गायत्रीचें निरूपण। ब्रह्मावबोधक ॥ १९ ॥ ध्यात असों या पदाचा। स्मरतों पर्याय तयाचा। इतुकाचि हेतु याचा। जें प्रातः स्मरावें ॥ ३२० ॥ तत्पद लक्ष्य परमात्मा। [illegible] त्वंपद लक्ष्य आत्मा। जाणिजे एकाचि

महात्मा । आत्माचि ब्रह्म ॥ ३२५ ॥ विचार हाचि अरुणोदय । तो अर्घ्य प्रदानाचा समय । तेव्हां स्थूलादि देहत्रय । समर्पणा योजावें ॥ ३३८ ॥

काकांची सद्गुरुपादुकांपुढें दंडनति हेंच देहत्रयसमर्पणाचें लक्षण होय. हें लक्षण त्यांच्या नित्य कर्मात घडोघडीं उघड दिसून येई. वस्तुतः हें त्यांचें समर्पण अखंडितच होतें. 'गुरुः साक्षात्परब्रह्म, तस्मै श्रीगुरुवेनमः' ही त्यांची अखंड धारणा होती. गुरुपदीं लीन असणें आणि आत्मपदीं लीन असणें हा भक्त आणि योगी यांच्यांतील नाममात्र भेद आहे. अद्वैत रहस्य एकच आहे. 'ज्ञान स्वरूपं । निजबोधरूपं । .... श्रीमद्गुरुम् नित्यमहं नमामि ।' असेंच काकांचें सद्गुरुवंदन असे. आचार्य म्हणतात—

**अन्वयव्यतिरेकाभ्यां जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु ।**
**यदेकं केवलं ज्ञानं तदेवाहं परं बृहत् ॥ ४ ॥**

अन्वयव्यतिरेकेंकडून । अवस्थां तिहीं एकलें ज्ञान । जें केवळ परब्रह्मपूर्ण । तेंचि मी ऐसें स्मरावें ॥ ३५० ॥ स्मरणासहित जागें व्हावें । स्मरण धरून झोंपीं जावें । यावत्प्राणहि राखावें । अनुसंधान साधकें ॥ ८३ ॥ हेचि अवधि असे याची । विचार अरुणोदयकाळाची । येथें अनुसंधान स्मरणाची । अखंडता ऐशी ॥ ८४ ॥ तोचि झाला आपण । किमपि नसे द्वैतभान । हेंचि सिद्धाचें स्मरण । करणें तें साधकां ॥ ८९ ॥

काका ज्यावेळीं बाह्यतः श्रीगुरुपादुकांचें वंदनअर्चन इत्यादि कर्म करण्यांत गुंतलेले नसत आणि इतर व्यावहारिक कर्मांतहि नसत, अशावेळीं ते आपल्या देहभानावर तरी आहेत कीं नाहींत, याची पाहणारास शंका वाटे. देहभानावर नसणें अशीच त्यांची सामान्य वृत्ति असे. तासं तास ते याच उदासीन वृत्तींत माच्यावर बसलेले असत व सभोंवार सांप्रदायिक मंडळीहि गुपचुप त्यांच्या ह्या वृत्तीकडे आश्चर्यानें पहात स्तब्ध असे.